सचित्र

# फुलांची बाग

## ( काव्य-संग्रह )

प्रस्तावना

श्री. मामा वरेरकर

फुलांची ओळख

कवि डॉ. रा. चिं. श्रीखंडे, एम्. बी. बी. एस्., कोल्हापूर.


लेखक,

कवि वासुदेवाग्रज

( श्री. मल्हार बाळकृष्ण शिंदे, बी. ए., बी. टी., )

अध्यापक, महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल,

कोल्हापूर.



प्रथमावृत्ति १९४१ प्रति ५००

मूल्य १। रुपया.

# अर्पणपत्रिका

श्रीमंत राजेश्री

**दत्ताजीराव बाळासाहेब घाटगे, सर्जेराव,**

जहागीराधिपति, कागल,

(धाकटी पाती)

यांचे चरणसेवेसीं

ही काव्यकृति

त्यांच्या अंगच्या रसिकता, विद्याभिरुचि,

गुणग्राहकता, दयालुत्व, परोपकारबुद्धि,

शालीनता, सत्यप्रेम, साधेपणा,

इत्यादि गुणांवर

लुब्ध होऊन

**सादर समर्पिली**

**आहे.**

—म. बा. शिंदे

(वासुदेवाग्रज)

# वाग्मेंत शिरण्यापूर्वी—



एक असा काल होता, कीं त्यावेळीं महाराष्ट्रांत गद्याची जागा काव्यानें घेतली होती. ज्या ज्या लेखकाला जें जें कांहीं लिहावयाचें असे तें तें तो काव्यांत लिही—निदान ओंवी–छंदांत तरी लिही. लेखन म्हणजे काव्यनिर्मिति असें त्या काळांत समजलें जात असे आणि म्हणूनच लेखकाला तत्कालीन कवींनीं सरसहा ‘कवि’ अशी संज्ञा दिली होती.

त्या जुन्या काळाकडे लक्ष देणारा आजचा संशोधक म्हणूनच पूर्वकालीन वाङ्मयाचा आढावा घेतांना ‘कवींचा’ निर्देश करीत असतो पण ते सारेच कवि नव्हते. मुक्तेश्वरादिकांना ‘कवि’ म्हणण्यांत आलें आहे, पण ते वस्तुतः नुसते ‘लेखक’ होते. महानुभावाच्या कालाप्रमाणें गद्य–लेखनाची प्रथा त्या वेळीं प्रचलित असती तर त्यांनीं आपलें सर्व लेखन गद्यांत केलें असतें. त्यांच्या लेखनांत काव्यमयता आहे, काव्यात्मकता आहे, उपमा आहेत, अलकार आहेत, तरीही विपुल वाङ्मय छंदांत निर्माण करणाऱ्या या वैष्णवकालीन कवींना ‘कवि’ म्हणतां येणार नाहीं. काव्याची आधुनिक कल्पना मराठी भाषेंत आली ती पाश्चात्य वाङ्मयांतून. आज ज्याला काव्य म्हटलें जातें त्याला वैष्णवकालीन कवि–संप्रदायाचा अभिमानी कदाचित् काव्य म्हणणारही नाहीं—असें जरी असलें तरी आधुनिक कवि-

संप्रदायाची कल्पना, त्या जुन्या संप्रदायाशीं तुलना केली असतां, पूर्व आणि पश्चिमेइतकीच दूर आहे असें 'आजचा कवि' म्हटल्यावांचून रहाणार नाहीं.

विशेषत: वैणिक काव्य ( Lyrics ) केवळ पाश्चात्यांच्या अनुकरणानें अस्तित्वांत आलें आहे. सुनीतही ( Sonnet ) पाश्चात्य आहे. आज लिहिलीं जाणारीं छोटीं पद्येंही वैणिक गीतेंच आहेत. अशी वस्तुस्थिति असतांना आजचें काव्य हातीं घेतांना कुणीही टीकाकार जुन्या वैष्णव-काव्याशीं त्याची तुलना करूं लागला तर कुठें तरी खटका आल्यावांचून रहात नाहीं.

तसें पाहिलें तर **ज्ञानदेव, नामदेव**–विशेषत: **तुकाराम**–यांचे अभंग-पंक्तींची मर्यादा सोडून दिली तर–सुनीतांच्या सदरात घेतां येतील. **नामदेव** आणि **तुकारामांचे** कांहीं अभंग वैणिक गीताच्या जातीचे आहेत–तरीही पाश्चात्य वाङ्मयाच्या दृष्टीनें तीं काव्यें पूर्णत्वानें 'वैणिकें' किंवा 'सुनीतें' ठरूं शकणार नाहींत.

आधुनिक काव्याची परंपरा निर्माण होतांना पाश्चात्यांइतकाच पर्शियन कवींचाही पगडा मराठी भाषेवर बसला असल्याचें दिसून येतें. आधुनिक काव्यांतील शृंगाराच्या कित्येक छटा जितक्या पाश्चात्य आहेत तितक्याच त्या पर्शियनही आहेत असा भास झाल्यावांचून रहात नाहीं. सर्वसामान्यत्वानें पाहतां, म्हणूनच, आधुनिक काव्याची परंपरा नव्या संस्कृतींतून निर्माण झाली आहे आणि तिचें आलोचन करतांना नव्या दृष्टीचाच अवलंब केला पाहिजे असें वाटूं लागतें.

या आधुनिक कवि–परंपरेंतील **मोगरे, माधवानुज, लेंभे, रेंदाळ-कर, नागेश**प्रभृती कवींच्या काव्यावर संस्कृताची छाप विशेष होती. **केशवसुतांच्या** कवितेने नव्या युगाचा आरंभ झाला आणि संस्कृत अलंकारांचे अवजड सोनेरी ओझें झुगारून 'महाराष्ट्र–कविता–वधू' साध्या हातसुतीच्या आणि हातविणीच्या खादींत वावरूं लागली. या युगां-तील **गोविंदाग्रज, तांबे**प्रभृती कवींनीं नव्या मर्यादा निर्माण केल्या. 'कविता–वधूच्या' सौंदर्याला अजूनही सरलता येणें प्राप्त होतें. त्या

सौंदर्याचें कलात्मक अनावृत्त स्वरूप **यशवंत, माधव ज्यूलिअनप्रभृती** आधुनिक कवींनीं दाखविलें आणि त्यांच्याच संप्रदायांत आजच्या काळां· तील बहुतेक सर्व कवि वावरत असल्याचें दिसून येतें.

काव्यसृष्टीचा हा विकास पुराण्या नजरेला अधोगत वाटत असला तरी सभ्यतेच्या आधुनिक विकासाशीं तो समांतर आहे यांत शंका नाहीं. या आधुनिक उत्क्रांतीच्या इतिहासांतूनच काव्यसृष्टींतील क्रांति निर्माण होणार आहे. आजच्या काळातील कवि हे त्या क्रांतीचे 'Baptist' आहेत.

या नव्या परंपरेच्या कवींत '**वासुदेवाग्रज**' यांची गणना करतां येईल. **कविवर्य तांब्यांची** उत्तुंग भरारी त्यांच्या काव्यांत जरी नसली तरी नव्या काळाचे नवे 'उमेदवार' या संज्ञेस पात्र होण्याइतकी मजल त्यांनीं या क्षेत्रांत गाठली आहे. आधुनिक काव्याचा सुबोधपणा जितका त्याच्या काव्यांत दिसून येतो तितक्याच सहृदय 'बाल–भावानें' त्यांचें काव्य निर्माण झालें आहे. विशेषतः बालकांकरतांच काव्यनिर्मिति करणें हा त्यांचा बाणा दिसतो.

विडंबनात्मक काव्याला जरी त्यानीं स्पर्श केलेला नाहीं तरीही **माधवरावांच्या 'मायबोली'चें** विनोदन हे त्यांच्या रसिकतेचें द्योतक आहे. प्रत्यक्ष विनोदात्मक कविताप्रमाणेंच '**विरहगीतां**'कडेहि त्यानीं दुर्लक्ष्य केलेलें नाहीं. '**अध्यापक**' आणि '**अल्लड तरुणी**'बरोबरच बहुजनांना जागृत करणाऱ्या कविताही त्यांनीं निर्माण केल्या आहेत. शब्दचित्रात्मक कविता विशेष उल्लेखनीय आहेत. जुन्या बाण्याच्या कवींना हृद्य वाटतील अशा उपमा, उत्प्रेक्षाही त्याच्या काव्यात विखुरल्या आहेत.

या काव्यांतील विशेष हा, कीं तीं बहुधा 'गेय' आहेत आणि काव्याला संगीताची जोड देणारा, कवि–हृदयाबरोबरच, संगीतकाराचा स्वरझंकारही त्याच्या काव्यात प्रतीत झाल्यावांचून राहत नाहीं.

प्रस्तुत काव्यसंग्रहाचे **कवि वासुदेवाग्रज** हे आपल्या सुबोध आणि मनोज्ञ रचनाकौशल्यानें अशा भविष्यकालाचे एक घटक होवोत आणि त्यांच्या हातून नव्या कालाची ध्वजा फडकावणारें उद्दीपक काव्य निर्माण होवो अशी आंतरिक इच्छा मी प्रदर्शित करतों.

कोल्हापूर<br>
१४-२-४१

**भा. वि. वरेरकर**

# उद्यान–वाटिकेंत



कवि 'वासुदेवाग्रज' यांचा 'रसवंती' नामक काव्यसंग्रह प्रसिद्ध होऊन ८–१० वर्षें झालीं. 'रसवंती' नंतरचीं त्यांनीं रचिलेलीं स्फुटकवनें प्रस्तुत संग्रहांत कवीनें एकत्रित केलीं आहेत. स्फुट कविता म्हणजे कवि–प्रतिभारूपी लतेचें एक पुष्पच. अर्थात् प्रस्तुत संग्रहास 'फुलांची बाग' हें अभिधान अगदीं यथार्थ आहे. रसिकांनीं या बागेंत शिरून पुष्पांचा सुगंध अवश्य लुटावा; कारण त्यांच्या प्रत्येक कवनपुष्पांत सुगंध खरोखरच आस्वादनीय असा आढळल्यावांचून राहणार नाहीं.

'वासुदेवाग्रज' हे स्वतः पदवीधर असून शिक्षकहि आहेत. या त्यांच्या पेशास अनुसरून प्रस्तुत संग्रहांतील कांहीं कवनें त्यांनीं शाळेसाठीं उत्सवार्थ प्रासगिक अशीं लिहिलीं आहेत. तथापि त्यांतहि माधुरीच आढळून येते. प्रसगाप्रसगांनेंच कवि काव्यप्रांतात प्रवेश करितो. म्हणून असें प्रासंगिक काव्य करण्याचे प्रसगहि कवननिर्मितीनें साजरे करणें अप्रासंगिक आहे असें अर्थातच कोणी म्हणणार नाहीं. अशाच प्रसंगांतून उत्तम असें महाकाव्यहि प्रसवण्याचा प्रसंग प्रतिभेस दैववशात् लाभूं शकतो. हा एक अभ्यास आहे व या अभ्यासाचा उपयोग प्रसंगीं तेजस्वी व दीर्घ काव्यनिर्मितींत होऊं शकेल अशी मला खात्री वाटते.

शिवाय श्री. ‘ **वासुदेवाग्रज** ’ हे कवि भक्तिभावानें भरलेले आहेत. ‘**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं**’ यांत सांगितल्याप्रमाणें आवडलेल्या विभूतींची भक्ति करणें त्यांच्या नम्र प्रतिभेस आवडतें व शोभूनहि दिसतें. **कविवर्य तांबे** यांच्याविषयींचे त्यांचे उद्गार पहा किंवा महाराष्ट्रास चटका लावून गेलेले ‘ **कै. माधव ज्यूलिअन** ’ यांच्याविषयींचें त्यांचें कवन पहा किंवा ‘**मराठी असे आमुची मायबोली** ’ या **माधवरावांच्या** कवितेवरून त्यांनीं वर्गांत निर्मिलेला एक काव्यप्रसंग वाचून पहा; त्यावरून वाचकास खात्रीनें कवीचा भक्तिभाव व किंचित् विनोदी स्वभाव हे आढळून येऊन आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. त्याच्या कवितांत खरोखरीची ‘ **अंतरींची तळमळ** ’ जी काव्यास आवश्यक हवी ती आढळून येऊन कवीचे बोल वाचकास पटतात व आनंद होतो.

कवीनें प्रत्यक्ष पाहिलेलें व अनुभवलेले अत्यंत आनंदाचे व दुःखाचेहि प्रसंग या जीवन-संसारांत अनेकविध असे आहेत व त्यांस कवनबद्ध करून कवीनें आपल्या हर्षदुःखाच्या आवेगांस योग्य अशी वाट करून दिली आहे. कै. **श्रीमच्छत्रपति राजाराम महाराज** यांस कन्याप्राप्ति होऊन अखिल जनतेस अत्यानद झाला ! या आनंदाचा आस्वाद प्रजा मनमुराद घेत आहे इतक्यांत श्रीमच्छत्रपतींचा अत्यंत शोकजनक अन्त व्हावा हा केवढा दैवदुर्विपाक ! ! हे आनंदातिरेकाचे व दुःखातिरेकाचे दोन्हीही प्रसंग **वासुदेवाग्रजांनीं** अनुरूप भाषेंत ग्रथित केले आहेत, आणि सहृदय वाचकाच्या अन्तःकरणांत ते ते रस त्यांचीं कवनें खास उत्पन्न करूं शकतील.

कवीस राष्ट्राच्या दैन्यावस्थेचीहि कींव येते; परंतु दैन्यावस्था दूर व्हावी एवढेंच कवि आर्ततेनें म्हणेल. ती दूर करण्याचें त्याच्या एकट्याच्या हातीं थोडेंच आहे ! कवीचा विनोदी स्वभाव ‘ **वेड्यांचें इस्पीतळ** ’ या कवितेंत दिसतो, तसाच तो ‘ **औटिंग** ’,वर उल्लेखिलेली ‘ **आमुची मायबोली** ’, व ‘ **आफ्रिकेची हुंडी पटल्यावर** ’ इत्यादि कवितांत रसिकांच्या निदर्शनास येईल.

कांहीं कविता खिन्न जीवास हुरूप आणण्यासाठींहि त्यांनीं रचलेल्या आहेत. उदाहरणार्थ ‘ **खिन्न अध्यापकास** ’ ही कविता पहा. ‘ **सौंदर्य-**

**संपन्न अल्लड तरुणीस** ' त्यांनीं छचोरपणा टाकून देण्याविषयीं इषारा दिला आहे. त्यांची ही कविताहि जशी वाचनीय आहे, तशीच त्यांची '**उठा हो ! उठा हो ! मराठे ! उठा हो !**' ही कविता स्फुरण देणारी आहे असें म्हणतां येईल.

एकंदरींत या '**बागे**'तील कविता-पुष्पें विविध जातींचीं असून सहृदयास आल्हाददायक झाल्यावांचून राहणार नाहींत अशींच आहेत. कवीचें हृदयहि कुसुम-सुकुमार असावें असें हीं कुसुमें सुचविल्यावांचून रहात नाहींत.

कवि वासुदेवाग्रज यांची **कल्पनाशक्ति**, त्यांच्या कांहीं सुरस उत्प्रेक्षा या कवनसंग्रहांत आहेत, त्यांवरून प्रतीतीस येऊं शकेल.

त्यांची **कलात्मक दृष्टि** प्रस्तुत संग्रहांतील शब्दचित्रें तर दाखवितीलच, पण त्यांनीं काव्यानुरूप काढवून घेतलेलीं विविध चित्रेंहि त्यांची कलासक्ति उत्तमपणें व्यक्तवितात.

आणखी एक विशेष हा कीं, **श्री. वासुदेवाग्रज** हे संगीत विद्येंतहि थोडेबहुत निष्णात आहेत. उत्तम काव्याला उत्तम संगीतकलेची व उत्तम चित्रकलेचीहि स्पृहणीय अशी जोड लाभली तर असा प्रसंग केव्हांहि अधिकच आल्हाददायक होऊं शकेल हें निःसंशय. एकाच व्यक्तींत असा मधुर मिलाफ व्हावा हें विशेष होय. अर्थात् संगीत कलेचा लाभ ग्रंथावरून घडणें शक्य नाहीं; तो प्रत्यक्षच अनुभविला पाहिजे. तथापि प्रस्तुत संग्रहांतील कवितांवर जी रागदारी व ताल वगैरेंची योजना मांडिली आहे, त्यांच्या प्रयोगानें काव्यरस अधिक लुटणें तज्ज्ञांसच शक्य होईल. इतर रसिक वाचकानीं नेहमींप्रमाणें केवळ काव्यार्थावर तहान भागवून घेतली पाहिजे, व अशी रसिक-तृप्ति करण्याचे बाबतींत कवि यशस्वी झाले आहेत असें खास म्हणतां येईल.

**कवि वासुदेवाग्रज** उत्तरोत्तर आपल्या **प्रतिभा-बलानें** स्पृहणीय उन्नतस्थान लाभोत अशी सदिच्छा व्यक्त करून मी हा अल्प लेख संपवितों.

कोल्हापूर<br>२१-२-४१

**रामचंद्र चिंतामण श्रीखंडे**

# औपचारिक कांहीं तरी

औपचारिक शिष्टाचार ज्याच्यापाशीं नाहीं तो मनुष्य कसला? दुसऱ्यानीं केलेल्या उपकाराची फेड आपल्या हातून अन्य प्रकारें होत नाहीं तर नाहीं, पण शब्दाने तरी एकाद्याबद्दल आपल्या मनांत वसत असलेलें कृतज्ञता-प्रेम आपल्याला व्यक्त करतां येईल! भावना-संचयाला वाट करून देणें हें स्वतःच्या समाधानाच्या दृष्टीनें जितकें इष्ट आहे तितकेंच लोकोपचाराच्या दृष्टीनेंहि आवश्यक आहे, आणि म्हणूनच मला औपचारिक कांहीं तरी सांगायचें आहे.

हल्लींच्या लघुकथा, कादंबऱ्या इत्यादि गद्य वाङ्मयाच्या काळांतही उच्च दर्जाचें काव्य-वाङ्मय विविधतेनें बाहेर पडून आपल्या आंगच्या गुणांनीं रसिकाचीं मनें मोहून टाकील यांत मला तिळमात्र शंका वाटत नाहीं. अरसिकाबद्दल मात्र मला काहींच सांगायचें नाहीं. '**पूजा**' या नावाच्या प्रारभींच्याच काव्यात मी माझी मनोभूमिका स्पष्ट केली आहे, तेव्हा मी स्वतांविषयीं अधिक कांहीं लिहीत नाहीं.

**कविवर्य भा. रा. तांबे** यांना, त्यांच्यावर लिहिलेली प्रस्तुत पुस्तकांतील कविता अत्यंत मनोरम वाटली व त्यांच्याकडून माझ्या या काव्यसंग्रहास प्रस्तावनाही मिळूं शकली असती, परंतु त्यांच्या प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें तें शक्य झालें नाहीं. अशा वेळीं प्रस्तावना कोणाकडून घ्यावी ह्या विवंचनेंत असतांच सुदैवानें **श्री. मामा वरेरकर** यांच्या येथील आगमनानें माझी ती काळजी दूर झाली. खरोखर माझी कल्पना नव्हती कीं माझ्या पुस्तकाला महाराष्ट्रांतल्या एका नामांकित व थोर साहित्यिकाचा प्रस्तावनालेख मिळेल म्हणून! त्यांची प्रस्तावना म्हणजे कपिलाषष्ठीचा योगच असें मी समजतों.

'वाङ्मय-श्रीखंड', 'सुश्लोकगोविंद' व 'सुश्लोककुमार' इत्यादि काव्यपुस्तकांचे विद्वान् लेखक कवि **डॉ. रा. चिं. श्रीखंडे**, एम्.बी.बी.एस्., यांनीं मोठ्या आनंदानें माझ्या या उद्यान-वाटिकेंत सहल करून बागेंतील पुष्पांची रसिकांस सरसिकतेनें सुरेख ओळख करून दिली याबद्दल त्यांचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

मला मोठा आनंद होतो कीं, आमचे परमपूज्य श्रीमंत सरकार **राजेश्री दत्ताजीराव बाळासाहेब** ऊर्फ **काकासाहेब घाटगे, सर्जेराव, जहागिराधिपति, कागल** (ज्युनिअर) यांना माझी '**फुलांची बाग**' फार आवडली व ती आपणांस अर्पण करण्याची मला त्यांनीं मोठ्या आनंदानें परवानगी दिली. एवढेंच नव्हे तर दरबार हॉलमधील आपली मोठी तसबीरही त्यांनीं, माझी विनंति मान्य करून, ब्लॉकसाठीं मजकडे पाठवून दिली. श्रीमंत सरकारांच्या या साध्या, दिलदार व थोर स्वभावा-बद्दल, त्यांच्या माझ्यावरील निस्सीम प्रेमाबद्दल व पितृतुल्य कृपाछत्रा-बद्दल मी श्रीमंत सरकारांचा आजन्म ऋणी आहें.

माझ्या यापूर्वींच्या '**रसवंती**' काव्यसंग्रहास करवीर दरबारनें २०० रुपयांचें पारितोषक देऊन मला मोठी आर्थिक मदत केली होती. या कामीं मे. रावबहादूर श्रीमंत **दादासाहेब सुर्वे**, प्राइम मिनिस्टर सरकार करवीर यांनीं व हल्लींचे डेप्युटि प्राईम मिनिस्टर सरकार मे० श्रीमंत **दत्तोबासाहेब भोंसले** यांनीं मला बहुमोल सहाय्य केलें असल्यामुळें या उभयतांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख येथें केल्यावांचून मला रहावत नाहीं.

प्रस्तुत काव्यसंग्रहांत काव्यानुकूल चित्रें घालण्याचा माझा उद्देश हाच कीं, चित्रावरून काव्य कोणत्या विषयावर आहे याची कल्पना येऊन तें वाचायची वाचकांस उत्सुकता वाटावी व त्या निमित्तानें कां होईना काव्य हाताळायचें महद्भाग्य त्या काव्याला लाभावें. देवालयांत घंटा टांगलेली असते, देवदर्शनास येणाऱ्यानें ती वाजवावी व त्या नाद–ब्रह्मांत आपलें मन विलीन करून देवदर्शन घ्यावें अशीच मनोभूमिका ती निर्माण करते. काव्यदेवतेच्या गाभाऱ्यांत दर्शनास येणाऱ्या वाचकभक्तांस प्रस्तुत पुस्तकां-तील चित्रें त्या घंटेसारखीं मार्गदर्शक व अनुकूल मनोभूमिका तयार करणारीं वाटतील अशी मला खात्री वाटते.

पुस्तकाच्या अंतर्बाह्य सजावटीसाठीं चित्रें काढून देऊन व अन्य प्रकारें ज्या चित्रकारांनीं व कलावंतांनीं मला उपकृत केलें त्यांचाही मी ऋणी आहें. अनुक्रमणिकेंत त्यांचीं नांवें आलीं असल्यानें मी येथें त्यांच्या नांवांचा पुनरुल्लेख स्थलाभावास्तव करीत नाहीं. तथापि श्री. बी. पी. पाटील फोटो

आर्टिस्ट जे. पी. पी. ( अमे. ), पुण्यांतील कला प्रोसेसचे मालक श्री. आगाशे व त्यांचे येथील शाखेचे मॅनेजर, श्री. उपासनी यांचा मी फार फार आभारी आहें. तसेंच डॉ. एस्. व्ही. शहा, बी. एस्सी.; पीएच्. डी. प्रिन्सिपॉल, राजाराम कॉलेज, कोल्हापूर, यांनीं कवितेसोबत राजाराम कॉलेजच्या इमारतीचा ब्लॉक छापावयास दिल्याबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहें.

स्थलाभावामुळें माझ्या अनेक मित्रांचा व सहाय्यकांचा नामनिर्देश मला येथें करतां येत नाहीं; तथापि माझे ग्वाल्हेरचे प्रिय मित्र **श्री.एम् आर. टिकेकर** बी.ए.,बी.टी.,यांनीं कायावाचामनसा मला केलेली बहुमोल मदत मीं कधींहि विसरणार नाहीं. तसेंच माझे सातारचे मित्र **श्री. स. ब. पाटील**, संपादक, 'अलंकार' यांनीं माझ्या प्रस्तुत पुस्तकास मला मोठी मदत केली असल्यानें त्याचे मनःपूर्वक आभार मानणें माझें कर्तव्यच ठरतें. माझ्या शाळेंतील कांहीं विद्यार्थिनीनींहि मला हरएक प्रकारें या कामीं हातभार लाविला आहे म्हणून त्या माझ्या प्रिय भगिनींचेंहि मी आभार मानतों.

माझे स्नेही व येथील स्कूल अॅण्ड कॉलेज बुक स्टॉलचे उत्साही मालक **श्री. डी. एन्. मोघे**, बी. ए. यांनीं हें पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. शेवटीं श्री. ज्ञानेश्वर प्रेसचे मालक व मॅनेजर यांनीं आपल्या प्रेसमध्यें हें पुस्तक सत्वर, सुबोध व अत्यंत आकर्षक तऱ्हेनें छापून दिल्याबद्दल मी त्यांचे हार्दिक आभार मानून हे औपचारिक चार शब्द पुरे करतों.

'श्रीशारदा निकेतन'
१९७६, राजारामपुरी,
कोल्हापूर.

रसिकांचा कृपाभिलाषी,
'**वासुदेवाग्रज**'

# प्रकाशकाचे दोन शब्द

माझे मित्र कवि **वासुदेवाग्रज** यांचा दुसरा हा काव्यसंग्रह रसिकांचे हातीं देताना मला फार आनद वाटतो. **कवि वासुदेवाग्रज** यांचा पहिला काव्यसंग्रह **'रसवंती'** सुमारें दहा वर्षांपूर्वी **'काव्यरत्नावली'**चे सुप्रसिद्ध संपादक कै. **नारायण नरसिंह फडणीस** यांनीं प्रकाशित करून रसिकांना सादर केला होता. **कवि वासुदेवाग्रज** यांच्या गेल्या दहा वर्षांतील स्फुट कवितांचा हा नाविन्यपूर्ण दुसरा सग्रह पाहण्यास दुर्दैवानें काव्यरत्नावलीचे संपादक आज हयात नाहींत याबद्दल वाईट वाटतें.

**कवि वासुदेवाग्रज** याच्या या काव्यसंग्रहांतील—फुलांच्या बागेंतील—काव्यसुमनांची ओळख माझे स्नेही **डॉ. रा. चिं. श्रीखंडे** यांनीं आपल्या समालोचनांत अधिकारवाणीनें केली असल्यानें रसिकांना त्याविषयीं अधिक कांहीं सांगण्याचे कारण नाहीं.

सुप्रसिद्ध साहित्यिक **श्री. मामा वरेरकर** यांची प्रस्तावना सदरहू संग्रहास लाभल्याबद्दल आनंद वाटतो.

**कवि वासुदेवाग्रज** याची ही सेवा रसिकांस मान्य होईल व उत्तरोत्तर अशीच सेवा करण्याला त्यांना रसिकांकडून उत्तेजन मिळेल अशी खात्री वाटते.

—दा. ना. मोघे.

# अनुक्रमणिका

## — प्रास्ताविक —



# काव्यानुक्रमणिका

—०—

# प्रसिद्धिस्थळें

| कविता | प्रसिद्धीचीं स्थळें |
|---|---|
| १ शारदास्तवन | महाराष्ट्रसाहित्य संमेलन, १७ वें अधिवेशन, कोल्हापूर. |
| २ पूजा | सत्यवादी, कोल्हापूर. |
| ३ बालवीर | सत्यवादी, कोल्हापूर. |
| ४ सौंदर्यसंपन्न अल्लड तरुणीस | अलंकार, सातारा. |
| ५ आमुची मायबोली | अलंकार, सातारा. |
| ६ स्मृतिसमाधीवर | अलंकार, सातारा. |
| ७ पतंगाची आर्त विनवणी | अलंकार, सातारा. |
| ८ गाइन मी मधुगीत | सत्यवादी, (दसरा अंक), कोल्हापूर.<br>अलंकार, सातारा.<br>दि एमेल्जियन्, कोल्हापूर. |
| ९ आफ्रिकेची हुंडी पटल्यावर— | अलंकार, सातारा. |
| १० आशा | ज्ञानप्रकाश, पुणें. |

# प्रथमचरणांची सूचि

# शारदा स्तवन

[ महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचें १७ वें अधिवेशन कोल्हापुरास ता. २० डिसेंबर १९३२ मध्यें भरलें होतें. त्यावेळीं श्रीमन्महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूलच्या विद्यार्थिनींनीं हें गीत गावून दाखविलें होतें. ]

[ राग :- हमीर. ताल :- एका. ]

( चाल :- ' विमल अधर निकटीं मोह हा ' )

नमन तुजसि विमल शारदे देवी ।
शिरसि वरदहस्त ठेविं ॥ धृ० ॥

प्रतिभा-सुंदर-रम्य-विलासीं । रमवि सरस्वती ॥१॥

# वंदन तुज भारतमाते

[ श्रीमहाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल, कोल्हापूर साठीं हें प्रार्थना-गीत त्यावेळच्या मुख्याध्यापिका व हल्लींच्या बी. टी. कॉलेजच्या प्राध्यापिका सौ. गंगुबाई कोकिळ, बी. ए., बी. टी., यांच्या अनुज्ञेवरून विरचिलें आहे. हल्लीं शाळेच्या कुठल्याही समारंभापूर्वी हें गीत एकाद्या गायक मुलीकडून म्हटलें जातें. ]

( राग :- बागेश्री. ताल :- एकताल. )

वंदन तुज भारत माते । वितरि तेज भारतांत ॥ ध्रु० ॥
मंगल तव प्रेम अतुल । दिव्य सुधा-निस्यंदिनि ।
देवि देइ चिरशांती । आज भारतातें ॥ १ ॥
तूं स्वतंत्रताभिमान, स्फूर्ति दीप्ति मूर्तिमान ।
जागृति तव बालिकांसि देइ सतत माते ॥ २ ॥

# पूजा—

( राग :– भैरवी. ताल :– धुमाळी )

बाग फुलांची विशाल जग हें फुलें खुडुनि घ्यावीं
नवोनव रंगीबेरंगी
विविध सुमांचा गुच्छ करावा अर्पावीं रसिकां
आंस ही हृदयीं नवरंगी
खुडिलीं वा वेंचिलीं शक्यतों दिसलीं सुंदरशीं
भरोनी परडी पुष्पांची
मधुर, सुगंधित, दळदारीं, वा गंधहीन, नटवीं
फसवीं मोहक हीं साचीं
मना मानलीं तीं तीं भरभर उचलुनि परडींत
टाकिलीं रसिकांच्यासाठीं
मान्य करावीं, हुंगावीं वा चुरडुनि टाकावीं—
रसिकें—दैवाच्या गोष्टी !
भाव मनीं माझा हा प्रभुवर, कीं तो करवील—
करावें तसे सदोदीत
अर्पावीं ना तरी तयाला तोच जनक ज्यांचा—
जाणतो भक्तांचे हेत !
चराचराचा स्वामी प्रभुवर फुलबागा फुलवी
अंतःसृष्टि सदा खुलवी !
इथेंच बसुनी मानस पूजा त्याची बांधावी
सुमनें त्यावर उधळावीं

कंठ मोकळा करुनी धावा करितां, येइल—
विमानीं दिव्य अशा बसुनी
निर्माल्यासह नेइल माझ्या प्राणरूप ज्योती
आपुल्या उंच उंच सदनीं !

---

## भारत माता

( राग :– ललत. ताल :– त्रिताल. )

[ महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल, कोल्हापूर येथें हें दररोज प्रार्थनागीत म्हणून गायिलें जातें. ]

भारतमाता माना । प्राणाहुनि ही प्रियतम भुवनीं ॥ ध्रृ० ॥
धन दौलत, गणगोत, आप्तजन ।
अणु नच ते प्रिय मायभूमिहुन ।
श्रेष्ठ हिंदमाता सर्वांहुन ।
धन्य धन्य ही खचिताचि भुवनीं ॥ १ ॥
देवादिक येथेंच जन्मले ।
सत्वधीर रणधीर चमकले ।
भारतभूचें भाग्य उजळिलें ।
विलसत होती ही सिंहासनिं ॥ २ ॥

हरिश्चंद्र तारामति राणी ।
छत्रपति शिवराय नरमणी ।
नाम जयाचें ख्यात त्रिभुवनिं ।
पुत्रसुता ह्या धन्यचि त्रिजनिं ॥ ३ ॥
वर्षत होत्या त्या जलधारा ।
नाचत होत्या जेवि अप्सरा ।
सस्यश्यामल शोभे मधुरा ।
भारतमाता भाग्य शालिनी ॥ ४ ॥
हाय ! पडे पदिं दास्य-शृंखला ।
मंदभाग्य वा ये अजि तिजला ।
भारतमाता हो जरि अबला- ।
स्वतंत्रतेची परि ही जननी ॥ ५ ॥

*                    *

'स्वर्ण भूमि' ही पुनरपि भूवरिं ।
भारतमाता होइ लवकरी ।
गतवैभव येईल तिजकरीं ।
होइल मग ती मृतसंजीवनि ॥ ६ ॥
नमस्कार सद्भावें करितां ।
हर्ष-निर्भरा भारतमाता
जयजयकार असो तव आतां ।
जय देवी जय राष्ट्र-नंदिनी ॥ ७ ॥

## बालवीर

मी बालवीर हो असे खरा ।
हें तत्व मनीं दृढ तुम्हीं धरा ॥ ध्रु० ॥
बंधुभाव मम हृदीं विराजे ।
सत्यवचन हें लक्षण माझें ।
मी कारिन साह्य कवण्याहि नरा ॥ मी बालवीर० ॥ १ ॥
उच्चनीचता ही मी कांहीं— ।
कवणाठायीं पहात नाहीं ।
मी समान अवघ्या चराचरा ॥ मी बालवीर० ॥ २ ॥
पशुपक्षी वा मानव सारे ।
मित्र मला हें विश्वचि बा रे ।
प्रिय मजला ही सर्व धरा ॥ मी बालवीर० ॥ ३ ॥
संकटकालीं पडला श्रमला ।
प्रथम-साह्य हें मिळेल त्याला—
मजपासुनि हा बोध धरा ॥ मी बालवीर० ॥ ४ ॥
कर्तव्याला सदाच तत्पर ।
साह्य करीं मी प्रतिदिनिं सत्वर ।
बालवीर मी खराखुरा ॥ हें तत्व मनीं दृढ तुम्हीं धरा ॥ ५ ॥
निसर्ग मजला सुंदर भासे ।
मन्मुखिं सतत सुहास्यचि विलसे ।
मी मित्र जगाचा असे बरा । मी बालवीर० ॥ ६ ॥
बालचमू ही माझी सेना ।
नित्याचि माझा उष्कारि बाणा ।
ही जगत् छावणी पहा जरा । मी बालवीर हो असे खरा ॥ ७ ॥

# सौंदर्य-संपन्न अल्लड तरुणीस—

[ स्त्री-स्वातंत्र्य, कला-प्रेम, अनिर्बंध सुखलोलुपता इत्यादींस भुलून आज कितीतरी कुलीन व रूपसंपन्न कुमारिका आपल्या तारुण्याची व अखेर आयुष्याची होळीकरून घेत आहेत! प्रस्तुतचें काव्य अशाच एका रूपसंपन्न अल्लड कुमारिकेस उद्देशून लिहिलें आहे. ]

तारुण्याचे दिवस मजेचे जातिल सहज निघून ।
सौंदर्याचें पुष्प तुझें हें जाइल कोमेजून ॥
गर्व किती या नश्वर तनुचा धरिसी सतत मनांत ।
नटुनि थटुनि श्रृंगारिसि काया मिरविसि सकल जनांत ॥
तारुण्याचा बहर लुटाया सजातिल सारे चोर ।
फसूं नको ग ! म्हणूं नको त्यां 'माझा चित्त-चकोर !'
भ्रमरांपरि हे सारे जमतिल तुज भवती प्रियकांत !
गोड बोलुनी फशी पाडतिल होइल अंतीं घात !!

× × ×

सौंदर्याचें सुवर्णचंपक निर्मियलें नच विधिनें ।
हुंगुनि हुंगुनि फेंकुनि द्याया कोणीही भलत्यानें ॥
सुंदरशा वेलीला घ्यावें आम्रतरूनें स्कंधीं ।
तुला तसें अनुरूपपतीनें—विधिघटना ही साधी ॥
टाकुनि तो आधार चिरंतन भाळशील दुसऱ्याला ।
नटव्या थाटापायीं करूनी घेशिल जर्जर तनुला ॥
विषयसुखाला लुब्ध सकल जन कामुक हे तूं जाण ।
तव तनुचें निर्माल्यचि होइल जीवाची मम आण ॥

कला, प्रेम, स्त्री स्वातंत्र्याच्या सोज्वल नांवाखालीं।
फसवुनि भुलवुनि करतिल मातीमोल तनू तव सगळी ॥

---

# आमुची माय बोली

[ गर्ल्स हायस्कूलमधील मॅट्रिक क्लासांतल्या मुली त्या! '**आमुची माय बोली**' ही कविता मास्तर आज वर्गांत शिकविणार होते. 'मॅट्रिक-मराठी-मार्गदर्शिके'च्या आधारें मास्तर ती शिकविणार हें धूर्त विद्यार्थिनींस तेव्हांच कळलें. मग काय? मुलींना आयताच विनोदाला वाव मिळाला आणि खालील प्रकारचें विनोदी वाङ्मय वर्गांतच निर्माण झालें. ]

( **वृत्तः**- कै. माधव जूलिअन कृत ' आमुची मायबोली )

( **रागः**– खंबावती. **तालः**– त्रिताल. )

( मास्तर वर्गांत येण्यापूर्वीं— )

**एक मुलगी दुसऱ्या मुलीसः**—

मराठी असे आमुची मायबोली
कशाला तिला आज अभ्यासिणें ?
करूं कीं कधींही तिला साध्य आम्हीं
कशाला गडे येवढें त्या भिणें ? ॥ १ ॥

नको पुस्तकें हीं; नको तास आतां
नको मास्तरांची सदाची कथा !
किती त्रास हा बाइ होतो जिवाला !
मरावें किती रोज आम्हीं वृथा? ॥ २ ॥

दुसरी मुलगी:—

चला जाउया सांगुया मास्तरांना—
" नको तास हा आज कांहीं अम्हां !
मराठी असे आमुची मायबोली
कशाला वृथा घेतसा या श्रमा? ॥ ३ ॥
किती चांगलीं 'गाइडें' तीं निघालीं !
असे त्यांत 'शद्बार्थ आणि टिपा'
'प्रश्नोत्तरें' सांगतीं सर्व कांहीं
परीक्षेंत त्यांचीच व्हावी कृपा ! ॥ ४ ॥
तुम्हीं आणखी काय तें सांगणार
स्वताला तुम्हा येतसे कांहिं कां?
अम्हीं सर्व हें जाणतो घेउनीया—
घरीं घोकतां कीं तुम्हीं *'दर्शिका' ॥ ५ ॥

( इतक्यांत मास्तर वर्गात येतात. मुली त्यांच्या भोंवतीं घोळका करून उभ्या राहतात. त्यांतून कांही मागच्या मागें पलायन करतात. उरलेल्या मुली घेऊन मास्तर वर्गात '**आमुची मायबोली**' ही कविता शिकविण्यास सुरवात करतात. पण मुली युक्तीनें कशा 'ऑफ' घेतात पहा ! )

**मास्तर**—( कवितेची पहिली ओळ ):—
मराठी असे आमुची मायबोली

---

* मॅट्रिक-मराठी-मार्गदर्शिका

**एक मुलगी**—( हळूंच ):—

खरें हो खरें! यांत खोटें नसें!

**मास्तर**— ( कवितेची दुसरी ओळ ):—

नसो आज ऐश्वर्य या माउलीला

**दुसरी मुलगी**— ( हळूंच ):—

अम्हां तास द्या ऑफ आतां कसे? ॥ ६ ॥

**मास्तर**—( त्रासून ):—

नको कां शिकाया तुम्हां ही मराठी?

धरा लक्तराची हिच्या लाज कीं?

**मुली**— ( सर्व मिळून ):—

धरूं लाज आम्हीं, हिचे पांग फेडूं!

परी ऑफ द्या एकदां सर कीं? ॥ ७ ॥

**मास्तर**— ( नाइलाजास्तव तास ऑफ म्हणून जाहीर करतात ):-

असे हा दिला ऑफ आजी तुम्हांला

परी नाहीं हें रोज चालायचें?

'मराठी असे आमुची मायबोली'

कधीं हें मनीं सत्य बाणायचें? ॥ ८ ॥

मुली— ( आनंदून ):—

किती छान तुम्हीं! अम्हां ऑफ देतां

तसे दूसरे देति ना हो कधीं!

जिवाला विसावा असा हाच वाटे—

अम्हां तास हा सर आधीमधीं ॥ ९ ॥

* * *

'मराठी असे आमुची मायबोली'

कळाली कवीता किती झट्दिशी!



असे हा दिला ऑफ आजी तुम्हाला, परी नाहिं हें रोज चालायचें ।

अर्थाविणें बोध झाला मनाला
मराठीच हो मायबोली तशी! ॥ १० ॥

---

टीपः— म. ल. गर्ल्स हायस्कूलच्या ॲडव्होकेट एस्. जी. दाभोळकर यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या विविध करमणुकीच्या कार्यक्रमा दिवशीं हें नाटय-काव्य खालील मुलींनीं उत्कृष्ट ' मेक्अप् ' करून ऑर्केस्ट्राचे सुंदर साथींत अभिनयपूर्ण रीतीनें सुंदर गाऊन दाखविलें.

मास्तरः— कु. सरल पंगु.

मुली—

कु. भागारथी गजेंद्रगड, कु. विमल पाटील,
कु. वायंगणकर, कु. घाटे, कु. कात्रे वगैरे.

कै. माधव ज्यूलिअनच्या

# स्मृतिसमाधीवर–

( दुःस्वप्नें खरीं ठरतात ती अशीं! माधव ज्यूलिअन दिवंगत होण्याच्या आधल्या दिवशींच पडलेलें स्वप्न इतकें खरें ठरावें ना? दुर्दैव आमच्या महाराष्ट्राचें कीं असलीं उज्ज्वल रत्नें अकालीं आमच्या मधून लुप्त होत आहेत! )

मध्यरात्रींच्या अवसरीं। अर्धझोंपीं गेल्यावरी ॥
देखिलें मीं स्वप्न डोळां। एक उल्का-पात झाला ॥
खळाळलें तेज गगनीं। त्यांत उठे मृदु ध्वनी ॥
"प्रणाम हा माझा घ्या हो। सानथोर रसिकांनो ॥
दया लोभ ठेवा न वा। माय बोलीला भजा हो!" ॥

* * *

केवढा तो दिव्य झोत। नभांतुनी उडी घेत— ॥
हात उभारोनी गायी। हृदयींचें अंत्यगीत ॥
त्यांत हांसरी ती मुद्रा। देखुनी हो भग्न निद्रा ॥
खडबडोनी जागा झालों। भयभीत मनीं ठेलों ॥
चैन पडेना जीवाला। आळविलें मी देवाला ॥
"—देवा राख माधवाला। आयु उदंड दे त्याला" ॥

* * *

भीषण तें स्वप्न सरलें। परि दुजें आणि पडलें ॥
सुवर्णाच्या मंचकांत। होता माधव निद्रित ॥



प्रणाम हा माझा घ्या हो, सान थोर रसिकांनो
दया लोभ ठेवा न वा, मायबोलीला भजा हो

गगनांत हळूंहळूं । तेज लागलें उजळूं ॥
उंच उंच गगनांत । निघे मंचक डौलांत ॥
डोकावूनी तारारूपें । हळूं पाहती कौतुकें ॥
स्वर्गीच्या त्या दिव्य नारी ! खुणवीती परोपरी ॥
बोलती हा युवा कोण ? । कोण कोण गे हा कोण ? ॥
रूप किती मनोहर । पहा पहा गे सुंदर ॥
चला चला गे साजणी । उठवूंया याला झणीं ॥
सुधा–धारांनीं अनेक । अमृताचा केला सेक ॥
उठवीलें माधवाला । दिलें उच्चासन त्याला ॥

* * *

धन्य धन्य तो माधव । स्वर्गीं झाला चिरंजीव ॥
मर्त्य आम्हीं—आठवावें । बोल तयाचे स्मरावे ॥
"प्रणाम हा माझा घ्या हो । सानथोर रसिकांनो ॥
दया लोभ ठेवा न वा । मायबोलीला भजा हो !" ॥

---

# पतंगाची आर्त विनवणी

[ काव्य-कल्पनेच्या भराऱ्या मारणाऱ्या कवीस कोणातरी सहृदय व थोर पुरुषाच्या आधारावांचून अंतरिक्षांत स्वैर भराऱ्या मारतां येणार नाहींत. प्रस्तुतचें काव्य अशाच एका प्रेमळ, थोर व उदार अंतःकरणाच्या व्यक्तीस उद्देशून लिहिलें आहे. )

[ चाल :- ' वाजते फटाफट गोफण माथ्यावरी ' ]

स्वैर उडूं द्या पतंग आतां वाऱ्यावर अंबरीं ।
घ्या हो दोरा तुमच्या करीं ॥ ध्रु० ॥

हा स्वयें बनविला आजवरी ना तुम्हीं !
आकार तयाला दिधला सुंदर तुम्हीं
डोलतो अहा हा जाण्या वरच्यावरीं
घट्ट धरोनी दोरा त्याला सोडा हळु वरिवरीं
पहा मग मौज तयाची खरी ॥ १ ॥

परिस्थितीचा वारा अनुकुल व्हावा त्याला अतां
निघे मग चढण्या नभिंच्या पथा
कल्पना भराऱ्या त्याच्या मग सुंदर
धजतील धराया अनंत हें अंबर
विश्वाचें उकलें गूढ तयाला वर
जाऊं द्या त्या वरवर आतां, घालूं द्या गवसणी
आकाशाला आतां झणीं ॥ २ ॥

* * *

पतग पाहुनि उंच नभीं हा हेवा मनिं वाटतो
कुणाच्या नयनीं तो सलतो
ओढतें पतंगा जग निर्दय खालतीं
कुणी पतंग दुसरा त्याजवरी सोडिती
तोडुनी तयाचा दोरा, त्या फाडिती
भग्नहृदय मग पडे खालती निराश होउनि पुरा
तयाला प्रेमें स्वकरीं धरा ॥ ३ ॥

* * *

आर्त जिवाची हीच विनवणी दिल्दारा, राजसा !
असो नच चिंता मन्मानसा

तुम्हिं दीन दयाळू माझे परमेश्वर
उद्धरा मला, द्या अभय असा तव कर
घेईन नांव मी तुमचें वरचेवर
मद्हृदयाच्या विमल मंदिरीं स्थापिन तव आकृती
होइल घडिघडि तव ही स्मृती ॥ ४ ॥

---

## मधुगीत—

[ आमचे परमपूज्य शिक्षणप्रेमी दयाळु प्रभु कै. श्रीमच्छत्रपति राजाराम महाराज सरकार करवीर यांना ता. ५-१०-४० इ. रोजीं रात्रौं कन्यारत्न झालें हें एकून मनास अत्यानंद झाला. तत्प्रसंगीं हें 'मधुगीत' विरचिलें आहे. प्रत्यक्ष जगदंबाच अवतीर्ण होऊन पुढें होणाऱ्या शिवरायांच्या अवताराची कार्यसिद्धता करीत आहे असें या गीतांत ध्वनित केलें आहे. ]

( **राग**:-जैजयवंती **ताल**:- ठाय त्रिताल. )

गाइन मी मधुगीत बालिके, गाइन मी मधुगीत ॥ धृ० ॥
कोमल सुंदर तूं नवबाला ।
मूर्तिमती अवतरसी कमला ॥
वाटे जणुं जगदंबा आलिस ।
खचितचि तूं अवनींत ।
बालिके, गाइन मी मधुगीत ॥ १ ॥
प्रेमभरें तूं हंसुनी रमविसि ।
मायपित्याच्या मृदु हृदयासी ॥
आनंदुनि जग नाचें सारें ॥
गात गोड संगीत । बालिके० । ॥ २ ॥

हलविसि पद हे वरती खालीं ।
मंदस्मित विलसें तव गालीं ॥
चराचराची आशा उरली । दिव्य तुझ्या दृष्टींत । बालिके० । ॥ ३ ॥

**राजाराम** पिता नृप असतां ।
**तारामति** राज्ञी तव माता ॥
कां तुजला मग बाले, चिंता? । नीज सुखें निश्चिंत । बालिके० ॥ ४ ॥

होशिल मोठी तूं जेव्हां, बघ ।
कार्यसुतत्पर होईल हें जग ॥
वेळ तुला मुळि राहिल नच मग । वीर बालिके, येथ । बालिके०॥ ५ ॥

शिव-सूर्याची दिव्य उषा तूं ।
सूचविसी तन्मार्ग परंतु ॥
कळला मनिंचा तव बघ हेतू ।
तोच येइ जगतांत खरें ना? । तोच येई जगतांत ? । बालिके० ॥ ६ ॥

हृदयाचा हिंदोला केला ।
जो जो करुनी निजविन तुजला ।
त्याजवरीं, मी गाउनि लीला । तव बाले दिनरात । बालिके० ॥ ७ ॥

# आफ्रिकेची हुंडी फटल्यावर—

## तो तिला दुरूनच नमस्कार करतो ! ते कां ?

आधुनिक पद्धतीचा पोषाख करून नटत मुरडत चाललेल्या एका काळ्या-कुट्ट ' आफ्रिकेच्या हुंडी' मागें एक उल्लु तरुण लागतो. पाठमोऱ्या आकृती वरून खऱ्या सौंदर्याची बिचाऱ्याला काय कल्पना होणार? झिरझिरीत शुभ्र वस्त्रांतून दिसणारा अंगांतील झंपर, बुचड्यांतील फुलांचा गजरा, कटिबंधापासून खालीं चापून चोपून नेसल्यामुळें मागून दिसणारा रेखीव भाग यामुळें गृहस्थ फसतो व ती सुंदरी जाईल तिकडे पाठोपाठ नजर ठेवून हाही पण तिला आड-वळणाला गांठण्याचा प्रयत्न करतो. चांदण्यारात्रीं भरवस्तींतून जरा पुढें गेल्यावर इकडे तिकडे कोणी नाहींतसें पाहून गृहस्थ जरा जलदाई करून त्या स्त्रीच्या अगदीं समीप गेल्यावर, ती आपल्यामागें कोण येत आहे म्हणून वळून पाहते, तेव्हा तिच्या सौंदर्याची यथार्थ कल्पना होऊन त्या गृहस्थाचा चेहरा कसा फोटो काढण्यासारखा होतो हें असल्या उल्लु तरुणासच माहित !

( चाल :- 'येऊं देत आतां घरीं ' किंवा ' राधे-कृष्ण बोल मुखसें ' )
[ थोडी अंतऱ्यास बदलून ]

ताल :- कवाली

तो :-

अतां तरी फीर मागें, नको पाहुं अंत माझा
नको पाहुं अंत



किती लांब आलों याची
नसे तुला खंत कांहीं
नसे तुला खंत ॥१॥

शोभे बुचड्यांत तुझ्या
फुलें सुकुमार, सखये
फुलें सुकुमार

वास दरवळे त्याचा
किती सभोंवार, सखये !
किती सभोंवार ॥२॥

मलमलीच्या वस्त्रांतूनी
दिसे तनु छान किती
दिसे तनु छान !

सुकुमार गोंडस बांधा, वर्ण गोरापान, सखये !
वर्ण गोरापान ! ॥३॥

रुम झुम रूम वाजे छानसे नुपूर पायीं
छानसे नुपूर
कंकणाचा नाद किती लागे मजेदार, सखये !
लागे मजेदार ॥४॥

ती:–

कोण तुम्हि ? या हो सखया ! किती गोड गोड तुम्ही
किती गोड गोड !
लाभेल कां प्रेमाची या दासिला हो जोड तुमच्या
दासिला हो जोड ? ॥५॥



ठेविन मी हृदयीं माझ्या
तुम्हां सदोदीत बाई
तुम्हां सदोदीत
ओवाळीन काया तुमच्या
वरूनी खचीत, सखया
वरूनी खचीत! ॥६॥

कां हो असे फिरला मागें?
—उमठलि लाज गालीं
उमठलि लाज!
विनयानें नम्र झाले चरणीं
मि आज, सखया!
चरणीं मि आज! ॥७॥

तो:—

दुरूनीच बोल, सखये! झळाळें हें तेज कित्ती
झळाळें हें तेज!
प्रभा पाहुनी ही भ्यालों! झालों पुरा चीत सखये!
झालों पुरा चीत! ॥८॥

वर्णुं काय रूप तुझें! उमटेना शद्ब वदनीं
उमटेना शद्ब!
'इंदुबिंदु' लाही करिसी रंगानेंच स्तब्ध, सखये!
रंगानेंच स्तब्ध! ॥९॥

छत्रि 'वॉटर प्रुफ्' ची काळी, अवसेचि रात किंवा
अवसेचि रात!

अशी अंगकांती नाहीं देखिली जगांत, सखये !
देखिली जगांत ! ॥१०॥
विटेवरी उभा हरी, कटेवरी हात ज्याच्या
कटेवरी हात–
तोच एक घेइल तुजला करूनी सनाथ आतां
करूनी सनाथ ! ॥११॥
मज पामराची काय तुझ्या पुढें मात, मात !
तुझ्यापुढें मात !
पवित्र तूं वंद्य जगतां; असो प्रणिपात तुजला ! असो प्रणिपात ! ॥१२॥



## आशा—

( **राग**— बिभास **ताल**— त्रिताल. )

उठि उठि उठि मनुजा उदेली—
उषा दिव्य आशा अवतरली ॥ध्रु॥
पहाट झाली फुलें उमललीं ।
लता हर्षल्या दिशा रंगल्या ॥
उदयगिरीवर लाली आली ॥१॥
मंद समीरण वहात सुटला ।
सुगंध पृथ्वीवर दरवळला ॥
खग-कूजित अति रंजित हृदया ।
उषः प्रभा वर आली ॥२॥
तिमिर लोपलें काळें काळें ।
दीपतेजही मंद जाहले ॥
उडुगण ते आकाशीं विरले ।
दिव्य उषा ही आली ॥३॥
मूर्तिमती ज्या वदतो आशा ।
तीच पहा अतिरम्य ही उषा ॥
स्फूर्तिमती ही शांतिदेवता ।
धरणीवर बघ आली ॥४॥




कां आहेत कां यांचीं मस्तकें ठिकाणावर ? अहो पळा,
नाहींतर तुम्हांलाहि वेड लागायचें यांच्या संगतींत !

# वेड्यांचें इस्पितळ–

गम्मत न्यारी। वेड्यांची वाटे भारी ॥ धृ० ॥

गरगर गिरक्या कोणी घेतो
उलटा सुलटा कोणी सरतो
मध्येंच कोणी स्तब्ध राहतो
गम्मत न्यारी। वेड्यांची वाटे भारी ॥ १ ॥

टाका देतो कुणि एकाकी
गजर मुखानें कुणि तरि घोकी
बोंब मारितो तिसरा तों कीं
गम्मत न्यारी। वेड्यांची वाटे भारी ॥ २ ॥

'खण् खण्', 'टक् टक्', 'खर्र खर्र' नें
किटले कानचि या किरकिरिनें
असे किती तरि दीड शहाणे
येथें भारी। गम्मत ही त्यांची न्यारी ॥ ३ ॥

दोन दावुनी अडीच वदती
विपरित मर्कट चेष्टा करिती
घटकेमाजीं जीवाचि देती
गम्मत न्यारी। वेड्यांची वाटे भारी ॥ ४ ॥

जातां येतां येथें पोहे
कोणा मेळ कुणाचा नोहे
माथेफिरूंचें स्थान असे हें
गम्मत न्यारी। वेड्यांची वाटे भारी ॥ ५ ॥

अपुल्या परि हे इतरां करिती
शहाणे सुरते क्षणांत चकती
वेड्यापरि ते वेडे बनती
गम्मत न्यारी । वेड्यांची वाटे भारी ॥ ६ ॥
असें कोणतें हें इस्पीतळ?
वेडी कोण इथें भूतावळ?
डॉक्टर कोण तयांचा? अटकळ
करतां कांहीं?........ तो *वड्याळकर्ता पाही ॥७॥

---

# माईची माया नाटिकेंतील पदें—

पडद्याचे आंत चालू असलेलें पार्श्वसंगीत—

**पद १. ( राग :**– तिलक कामोद, **ताल :**– एक्का )

नमन हें तुला, **छत्रपते** । तव यश गुणिजन ।
गाति सकल नित राष्ट्रांप्रति ॥धृ० ॥
प्रणतनाथ! सदय, शांत । तव पद रुचिर सुजनातें ।
देति नवें हें चिरसुख अति ॥१॥

**पद २.** ईशस्तवन

( **राग :**– तिलक कामोद, **ताल :**– झपताल )

चिदानंद तू आधार जीवा । तुझें रूप ईशा ।
वर्णितां ये न वेदां ॥ धृ० ॥

---

* वॉचमेकर या इंग्लीश शब्दाचें हें मराठीकरण आहे!

साम तव रूप बुध मानिती जगिं खरें।
मधुर गान म्हणुनि नेईल लोकां । मोक्षपदासी ॥ १ ॥

माईसाहेब पुष्पास मारतांना—

**पुष्पा पद ३.** ( **चाल** :—देस बंगाला मेरे राजा )
मारूं नको ग माई ॥ धृ० ॥
शिळा भात आंबली आमटी । थालिपीठ बुरसली दामटी ।
खाइन मटमट माई! माई! । मारूं नको ग माई ! ॥१॥

**पुष्पाः**— ( कविता गाऊन दाखविते )

**पद ४.** ( **राग** :—देसकार **ताल** :—एकताल )
बोल, बोल, बोल मधुर बोल बोल बाले ॥ धृ० ॥
जल, तरु, खग, विश्वगोल । गानलुब्ध जीव सकल ।
श्रवण त्यांत तव न विमल । भ्रांत चित्त झालें ॥ १ ॥
मुदित विश्व सकल डुलत । आमोदें गीत गात ।
तुजविण परि शून्य गमत । मजसि आज बाले ॥ २ ॥
प्रेमाची प्रतिमा मनिं । ध्यात बसूं किती अनुदिनिं ।
सुख न मिळत तुजवांचुनि । प्रेममुग्ध बाले ॥ ३ ॥
दुःख, शोक, विरहानल । सोसु किती तूंचि बोल ।
तळमळतां होय विकल । देह आजि बाले ॥ ४ ॥
लोटें हें नयनिं नीर । हृदया किति देउं धीर ।
लोटुं नको मजसि दूर । अश्रुधार चाले ॥ ५ ॥
मजवरि जरि प्रेम अतुल । धांवुनि ये त्वरित जवळ ।
गोड गोड बोल मृदुल । बोल बोल बाले ॥ ६ ॥

माईसाहेबांच्या स्वरूपाचें वर्णन

**मंजुळा पद ५.** ( **राग** :—सारंग **ताल** :—एकताल )
किति सुंदर! किति सुंदर ! रूप दिसत तें! ॥ धृ० ॥

देविच जणु मूर्तिमंत दिव्य ठाकली ।
त्यापरि तव खूप सुरत मूर्ति शोभली ॥ १ ॥
लागो नच दृष्ट तुम्हां म्हणुनि आपुला ।
फुंकुनि मग अंगारा मी हळूं दिला ॥ २ ॥
इडा पिडा टळो तुम्हांस देव हा सुखी ।
सोमेश्वर राखु दे न आस आणखी ॥ ३ ॥

मंजुळाबाईनीं आणलेलें तिळकूट चाखत चाखत

**दामिनी पद ६. ( ताल :- धुमाळी. )**

किति किति खमंग हें तिळकूट ॥ धृ० ॥
गोड गोड किति लागत रुचकर । आणखी थोडें आणा लवकर ।
माया तुमची किति ही मजवर । खरंच हें गुळमट ।
हां हां खरंच हें गुळमट ॥ १ ॥

( कलेक्टरीणबाईंच्या आगमनाचे वेळीं म्हणावयाचें **स्वागत-गीत** )

**पद ७. ( राग :- आसावरी. ताल :- झपताल. )**

आला सुखद खास । प्रेमें करायास ।
शुभ समय सुस्वागता । मोद हृदयास ॥ धृ० ॥
नमितो विदूषींस । ज्ञानी सुगृहिणींस ।
देवोत त्या बोध । या अज्ञ भगिनींस ॥ १ ॥
वाहूं सुमनहार । गाऊं मधुर गान ।
नाचोनि बेभान । सेवूं चरण खास ॥ २ ॥

**पद ८. ( राग :- सिंदुरा. ताल :- केरवा. )**

वाहूं प्रेमें माला । प्रभुला । विमल सुमनयुत ॥ धृ० ॥
सुंदर ललना नाचत ठुमकत । वाहूं प्रभूला माला अविरत ॥ १ ॥

# जिका-शिकाच्या भेटी—

( चालः—'कुणा नाहीं बघवलें बाळ लुटूलुटू चाले' )

भर रानामंदि कोण
बरं असंल तें गात ? । उभा कवापुनं येथ ॥१॥
चाललया गानं जनु
कसं झुळू झुळू पानी । मन झालं येडयावानी ॥२॥
खळाळतो वडा जनु
कसा पांढऱ्या पान्याचा । सूर तसा या गान्याचा ॥३॥
हळु हळु गडया थांब
जरा जाऊ नग म्होरं । अगा थांबल त्यो सूर ॥४॥
म्होरं जाउनूशानि मीच
हळु बघून येईन । कोन गातय् ते न्हाळीन ॥५॥
बस हतं गडया म्होरं
येउं नग नग अगर्दी । आलो आलो बरं जल्दी ? ॥६॥

*  *  *

बोलुनूशानि गडि गेला
शिवारांत बघायाला । लागला ततच डोलायला ॥७॥
झाला गान्यानं त्या येडा—
पिसा सुद्द न्हाई त्याला । गडी ततच कीं रमला ॥८॥

*  *  *

चला आपणहि पाहू
काय झाला तो प्रकार । चला चला अस म्होर ॥९॥
थांबा थांबा इथ बघा

म्होरं शेतात ती पोर । एक सुंदरशी नार ॥१०॥
हातिं घेउन कोयता
कापे सपासपा शेत । गाते मंजूळसें गीत ॥११॥
गाण्यासाठिं पिकें सुद्धां
जणु पडति धरणीला । होति सिद्ध मरायाला ॥१२॥
सोळा सतरा वर्षांचि
खूप सुरत ती नारी । नेत्रिं तिच्या मजा न्यारी ॥१३॥
किति गोड तिचा गळा
किति सुरेल तें गीत । थरारें हें उभें शेत ॥१४॥
दुमदुमे नाद परि
किति करुण तें गीत ! । भिडे जाऊन हृदयांत ॥१५॥
तिच्या लागला जिवाला
घोर कोणत्या गोष्टीचा ? । ध्यास घेतला कोणाचा ? ॥१६॥
नेत्रिं खळाळें हें पाणि
गालांवरून ओघळतें । उरावरी तिच्या पडतें ॥१७॥
कोण जिवाचा तो राजा
ज्याच्यासाठींच धडपडते । गीत करुण हें गाते ॥१८॥
शिवारांत आड उभा
शिवा हळूंच मग गेला । पुढें तिला धरायाला ॥१९॥
जिवा–शिवाच्या त्या भेटी—
झाल्या; आता विरें गीत । हृदयाच्या हृदयांत ! ॥२०॥

# चाहीन तुम्हां, जेव्हां-

**चालः**— मानुं गाना हरगीज. गज्जल.

[ शिष्टाचार म्हणून वाटेल तितका आणि वाटेल त्यावेळीं घशांत ओतला जाणारा चहाच आमच्या नाशाचें कारण नव्हे काय? मद्यपानबंदी इतका नसला तरी जवळ जवळ तितकाच महत्त्वाचा हा प्रश्न आहे असें मला वाटतें. ]

टाकुनिया कर–पाश ।
असु खेंचियलें हो— १
कां झोंप अशी नयनांस?
यम–पाश गळां हो !— २
ही कीड नव्या रुधिरास !
कां स्वस्थ असे हो?— ३
मधु पेय नसे हें—
विष खास असे हो !— ४

* * *

चाहीन तुम्हां, जेव्हां—
सोडाल चहा हो !— ५

# कां हो अवमानितां ?

( राग— तिलंग. ताल— त्रिताल. )

कां हो अवमानिता ?
धि:कारुनि मज कटु वच बोलुनि दूर लोटिता ॥ ध्रु० ॥

दीन दरिद्री झालों म्हणुनी
पादतळीं निर्माल्य गणोनी
टाकितसा मज कां चुरगळुनी
माना मान्य तरी मानवता ? ॥ कां हो० ॥ १

उच्चनीचता कुठें ? कशाला ?
श्रीमंतीगरिबीला जाळा
देखावा हा वरवर सगळा
अंतरिं एकचि तत्व तत्वता ॥ कां हो० ॥ २
श्रीमंती वाड्यांत न बसते
ऐश्वर्यी लोळल्या न टरते
मानवतेच्या हृदयिं शोभते
जागवि म्हणुनी ही सहृदयता ॥ कां हो० ॥ ३

मानव मी मज ज्यानें घडिलें
मानस-मंदिर त्यानें रचिलें
वास फुलांचा आंत दरवळे
वोहळुनि कां व्यर्थ पाहता ॥ कां हो० ॥ ४

सबाह्य अंतरिं एकचि सगळें
विश्वव्यापक तत्व विनटलें
सर्वांतरिं सारखेंच भरलें
कां मग 'मी तूं' अशी भिन्नता? ॥ कां हो० ॥ ५
अंतरिंचें सौंदर्य आगळें
चर्मचक्षुंना नच कांहिं कळें
दिव्य दृष्टिला फक्त आकळें
तेणें मजला पाही आतां ॥ कां हो० ॥ ६
व्यापुनि स्थिरचरही जो उरला
हृदयस्थित विश्वंभर नटला
तो प्रभुराजा आंत बैसला
या, देखा! वर काय पाहतां? ॥ कां हो० ॥ ७

# कविवर्य भा. रा. तांबे यांस--

( चालः-प्रिये प्रेरणे थांब गडे हा पहा लागला गिरी )

वाजवि वाजवि पुनरपि तव ती गोड अशी बासरी
लाभु दे गान-सुलभ माधुरी ॥धृ०॥
निनादती ते सूर आजही कर्णीं जैसे तसे ।
भरुनि हा ऊर पहा येतसे ॥
दिशादिशांतुनि प्रबळ अशा त्वत्स्फूर्तींचे ते कण ।
भरले रोमरंध्रिं जाउन ॥
किति जादू भरली अंगुलींत तव असे ।
मन वेडावें हें— भरलें अंगीं पिसें ।
अस्वस्थ चित्त हें पहा जाहलें कसें ।
वाजवि वाजवि पुनरपि तव ती गोड अशी बासरी ।
लाभुं दे गान-सुलभ माधुरी ॥१॥
जादूनें त्या डोलविल्या तूं वनराई सारल्या ।
निसर्गांतिल वस्तू सारल्या ॥
चराचराला मधुगीतानें संजीवनि त्वां दिली ।
अमरही तत्काया जाहली ॥
मनिं उठती किती त्या स्मृति पहिल्या गोडशा ।
भावनाभरें हो शून्यचि साऱ्या दिशा ।
ऐकाव्या वाटति मधु ताना स्वैरशा ।
वाजवि वाजवि, कविराया ! ती पुनरपि तव बासरी ।
लाभुं दे गान-सुलभ माधुरी ॥२॥



तूं भास्कर जगती साथे खरा शोभसी । तू स्वयप्रकाश जगतावर तळपसी ।।

स्वरकिन्नर गंधर्वलोकिंचा तूं गमसी गायक ।
भरले मधुघट तूं साजुक ।
अमृतमय ते घट भरलेले काय जाहले रिते ?
सांग कविराया, हें आमुतें ॥

संसार वह्निनें तप्त तनू जाहल्या ।
शांतता द्यावया कविता त्वां विरचिल्या ।
त्या मूक अतां कविराया ! कां बैसल्या ?—
बोल, बोल, ती पुनरपि वाजिव काव्यगीत–बांसरी ।
लाभूं दे गानसुलभ माधुरी ॥३॥

* * *

जीर्ण जरी तव कृश तनु भासे तरुणचि तें त्वन्मन ।
खेळतें सान बालकांतुन ॥
सान बालकें आम्हीं बघतों आसावुनि तुजकडे ।
आणि तव अमर काव्यकृतिकडे ॥
**तूं भास्कर** जगतीं सार्थ खरा शोभसी ।
तूं स्वयंप्रकाशें जगतावरि तळपसी ।
परि मंदतेज तव किरणें झालीं कशीं ?
अभ्रें आलीं असतिल पुढतीं, सार तयांना दुरीं
लाभुं दे तव दर्शन सत्वरीं ॥४॥

—०—

# खिन्न अध्यापकास—

( राग—तिलंग. ताल—त्रिताल )

तूं खचित असा कां खिन्न मनीं ?
मनिं काय वसे तव सांग झणीं ॥ ध्रु० ॥

ब्रह्मा विष्णू महेश हे गुरु
परब्रह्म-अवतार सद्गुरु
गुरुला मानित होते सुरतरु
मान न आतां तो म्हणुनी १

विषण्ण कां हें चित्त ठेविसी
आली घटिका काढ कशिबशी
झुरूं नको अंतरिं वा दिननिशिं
—काळिज झरझर हें करुनी २

गेला महिमा जाऊं दे पण
नको घालवूं एकहि तो क्षण
कार्य करी;—जा त्यांतच रंगुन
कार्यांतचि सन्मान गणीं ३

वाढिव महिमा अपुला आपण
क्षणोक्षणीं वेंचीं विद्याकण
अंतरिंचें सामर्थ्य वाढवुन
राष्ट्राचा हो कंठमणी ४

सान कोवळया बालबालिका
सृष्टींतिल पुष्पें अन् कलिका
पाहति या तव मुखीं टकमका
मृदु साधन घे हातिं झणीं ५

आकृति द्यावी तैशी येइल
आणशील मनिं तें तें होइल
शिल्पकार राष्ट्राचा होशिल
मान,–न हा अवमान–,गणीं ६

ऊठ ऊठ, करि कार्य परंतु
ठेवुनि साक्षी परमेशा तूं
आणि न मनिं कसलाही किंतू
जाइल तव चिंता पळुनी ७

येइल काळ असा मग तुजला
शिरिं धारिल इहलोकच सगळा
वंद्यचि होशिल तूं जगताला
भाग्य तुझें उजळेल झणीं
तूं खचित असा कां खिन्न मनीं ८

———

## श्रान्त पथिक--

(चाल :–' रचिलें प्रभूनें जग हें विशाल '–कुंकू बोलपट. )

किती तुझी वाट तरी बघूं रे
श्रमूनि गेली तनु व्यर्थ बा रे १
मी हिंडलों घोर वनीं उपाशी
तेथेंहि नाहीं तव भेट कैसी ? २
तूं राहसी व्यापुनि विश्व सारें
दृष्टीस माझ्या पडसी न कां रे ? ३
कीं बोलतीं तूं शरणागतांसी
येऊनि साक्षात्प्रभु भेट देसी ४
कोठें अतां तूं पळसी दुरीं रे
धांवूं किती सांग अतां तरी रे ? ५
ठेंचाळलों !—कंटक बोंचती हे !
तीव्रातपें पायहि भाजती हे ! ६
तृषा किती लागलि !—तोय नाहीं !
तोयाविणें जीव सुकोनि जाई ! ७
ऐसी खरें जीवन तूं म्हणोन
तुला कुणी बोलति ' विश्वजीवन ' ८
अतां पुढें पाय पडूं शकेना
हे धांव देवा, करुणानिधाना ९
हा देह पायीं तव अर्पियेला
तूं तार वा मार मला दयाळा ! १०



आतां पुढें पाय पडूं शकेना, हे धांव देवा ! करुणा—निधाना !

# घाला हो भिक्षा माई!

( चालः—' सह्याद्रीच्या तळीं शोभतें हिरवें तळ कोंकण ' )

सणासुदीचा दिवस दिवाळी घाला भिक्षा कांहीं
करंजी, लाडू, उरला सुरला गोड घांस द्या माई १
उष्टें खाइन तुमचें, पायां पडतों, दीन उपाशी!
कींव येउंद्या पोर मागते आज गोड खायासी! २
आईवांचुनि पोर पोरकी झाली ही इवलीशी!
हीच जिवाची जिवलग; धरितों इजला मी हृदयाशीं! ३
थंडीनें या हुडहुड भरते, दांत वाजती माई
फाटुन चिंध्या झाल्या अंगावरती कपडा नाहीं ४
काय करूं हें दैवच फुटकें! दोष कुणाला देऊं?
पोर सारखी तडफडते तिज काय खावया देऊं? ५
कुण्या जन्मिचें असेल केलें पातक आम्हीं कांहीं
म्हणुनि आंधळा होउन फिरतों दारोदारीं माई! ६

* * *

नीघ येथुनी वटवट करिशी किती मघांपासून
लाज न कशि ती तुम्हांस वाटे, किटले आमुचे कान ७
शिळा वाळला तुकडा आतां कुठला तुज आणावा?
कुत्र्यापुढतीं कधींच दिधला टाकुनि, कैसा व्हावा? ८

* * *

लाडू, करंजी, भात, जराशी आमटी तरि द्या माई
इथेंच बसुनी खातों दोघें—पुढें चालवत नाहीं ! ९
ओरओरडुन घसा वाळला प्राण उतरला कंठीं
कांहिं न देती कोणी खाया परि आशा ही मोठी ! १०
थोर तुम्ही मावाप ! तुम्हांला असतिल बाळें पोटीं
करा कींव दीनावर द्या हो शिळी वाळली रोटी ! ११

* * *

उर्मट कुठला ! गोड करंज्या बापानें तव आणिल्या
उठतो येथुन कां घालूं ह्या काठ्या पाठिंत पहिल्या ? १२
ताजा भात नि आमटी वरती ! वा रे वा रे थाट !
भिकारडा अन् मिजास करतो ! लाग चालण्या वाट ! १३
उष्टं पडलें म्हणजे ये जा ! पंगत नाहीं पडली !
पत्रावळि मग घालिन तुजला येशिल जर त्या वेळीं ! १४

* * *

काय दानशूरत्व बाइचें ! जणों अहिल्याबाई !
'पत्रावळि घालीन' म्हणे 'मग,' ! अंगाची हो लाही ! १५
असंख्य दुबळे दीन उपाशी उष्ट्यासाठीं मरती !
उकीरड्यावर ढीग पडे ! कां अन्नाची ही मस्ती ? १६
अन्नाचा लवलेश तयांच्या पोटीं जातच नाहीं !
नको नको त्यां आग्रह करुनी ताटिं टाकते माई ! ! १७
अभागि हिंदुस्थान अशानें येइल कां कधिं वरती ?
जेथ भुकीं कंगाल आंधळीं अन्नाविण हो मरतीं ! ! १८

---

# स्वामी विवेकानंद–

( राग–पटदीप. ताल–झपताल. )

प्रखर तेजोमयी मूर्ति तव एकदां । तळपली भूवरीं हिंदभू-स्फूर्तिदा ॥
चित्तांत या खोल । सतत तव बहुमोल । ठेवूं सुधे बोल ।
मोक्ष-सौख्यप्रदा ॥ १ ॥

जो जो जो वीर कुमारा ॥ ध्रु० ॥

उजळल्या दिशा सोल्हासें । चिद्भानू उदया आला ।
मंगलमय सृष्टिसतीच्या । बहु हर्ष मनासी झाला ।
( चाल ) फेंकिला गुलाल उषेनें । प्राचीही हर्षित सु–मनें ।
उधळीं वर तारा–सुमनें । गुण मंजुळ गाई वारा ॥
जो जो जो० १

प्रेमाची दोरी धरुनी । भुवनेश्वरि झोंके घाली
विश्वनाथबाबू ताता । मायेची पांखर घाली
( चाल ) वीरेश्वर वीर नरेंद्रा । घे आतां सुखमय निद्रा
मग उठुनी दावि सु-भद्रा । स्फूर्तिप्रद सोज्ज्वल स्व-करा ॥
जो जो जो० २

जाउनी परांच्या राष्ट्रीं । ध्वज लावी सद्धर्माचा
पटवि हा अलौकिक महिमा । सद्गुरू परमहंसाचा ।
( चाल ) सर्वत्र मठां स्थापाया । आत्मरूपदर्शन द्याया ।
ईश्वरी तेज दावाया । ये पुनरपि भूवरिं धीरा ॥
जो जो जो० ३

ज्या **मंगल** संक्रमसमयीं । स्थित्यंतर जगतीं होतें
विश्वाच्या जीर्ण शरीरीं । चैतन्य नवें संचरतें
(चाल) त्या विमल शुभंकर सुदिनीं । परमात्मा **श्रीविष्णूनीं**
'**तिळगूळ**' तुला समजोनी । दिधलें या **भारतभूला** ॥
जो जो जो० ४

करि स्वामिन् धर्मक्रांती । जगतांत **विवेकानंदा**
ही आस आमुची पुरवी । हे ज्ञान-कमल-मकरंदा
(चाल) **तिळगूळा!** वाढवि गोडी । स्वार्थाचें नरडें फोडी
राष्ट्रीय सुमैत्री जोडी । करि धर्मजागृती वीरा ॥
जो जो जो० ५



कशि काय केली मजा अतां
केली कविता मीच स्वतां ||

# औटिंग

[ महाराणी ताराबाई टीचर्स कॉलेज कोल्हापूरचा स्काउट कँप रुकडी येथील सरकारी बंगल्यांत होता. कँप फायरपुढें विद्यार्थ्यांनीं कांहीं तरी करमणूक म्हणून करून दाखवावी लागते. करमणुकीच्या कार्यक्रमांत माझें नांव त्या दिवशींच्या पेट्रोल लीडर ( Patrol Leader )नें दाखल केलें. मला विचार पडला कीं आतां कसली करमणूक करावी ? परंतु लगेच आठवलें कीं कै. श्री. कृ. कोल्हटकरांच्या 'यांत्रिक काव्या'पैकीं कांहींसा प्रकार करून दाखविला तर तो खचित हास्य निर्माण करील लगेच कँप-मधील वातावरण निर्माण करणारे इकडचे तिकडचे शब्द घेऊन, त्यांतच स्काउट येल्स (yells) घुसडून व **कुमार रघुवीर (सामंत)** यांची 'हुंपा हुंपा' ही गाण्याची ओळ त्याच चालींत बसतेसें पाहून दिली झालें एक कविता गावून ! वाचाच ती म्हणजे समजेल किती सुंदर काव्य आहे तें ! ]

( **चालः**—'घुम् गडे घुम् गडे घागर घुम्' )

औटिंगसाठीं चला चला । जय बोला जय, जय, बोला
टाका आधीं उड्या पुढें । पाहूं पुढतीं काय घडे
* 'टी ऑर नो टी' पळा पळा । उजवीडावीकडे वळा
पडलां तरिही पळा पुढें । सहज पडे दंड्वंत घडे
कांकूं कांकूं करूं नका । होय् नाहिं होय् नाहिं म्हणूं नका
स्काऊट सच्चा वीर कसा ?। स्नेहाळू जरदाळु जसा !
मित्र तयाचे किती तरी । डॉग्, कॅट्, कॉक्, हेन्, टॉम्, टिम्, टम्

* प्रो. बी. आर. कोल्हटकर, यांची आम्हांला स्पष्ट आज्ञा होती कीं स्काऊटनें ड्रिलची शीळ ऐकूं आली कीं चहा मिळो अगर न मिळो पळत सुटलें पाहिजे.

+टी आर् ए एम् ट्रॅम् ट्रॅम् ट्रॅम् ।
बी यू एस् बस् बस् बस् बस्
×जा के मौला दंफरदं । जी यो बच्चे खुषि रहो तुम्
हुंपा हुंपा हुंपा हूं । हुहुहू, हुहुहू, हुहुहू, हू
कशि काय केली मजा अतां? । केली कविता मीच स्वता !!
हहाहा !, हहाहा !, हहाहा ! हा !, हाः हाः, हाः हाः, हाः हाः हाः,

---

# मित्रवियोग

( चालः—वंदन तुज मायभूमि हें अखेरचें )

चालें जग पुनरपि हें पूर्विंच्यापरी
जीव झुरे तुजवांचुनि मात्र अंतरीं १
येथ खालतीं अथांग सागरांत रे
ओढुनि कुणिं नेलें तुज सांग मज बरें? २

---

+ हा येल् आम्हांला प्रो. कोल्हटकरांनींच शिकविला होता. परंतु काव्यांत त्याचा कसा छान उपयोग झाला आहे पहा! 'बस्' (Bus) म्हणजे गाडी, बस म्हणजे 'खालीं बैस,' व ज़रा 'स' वर जोर दिला कीं 'बस्स्' म्हणजे 'आतां पुरे' असा अर्थ निघतो. खऱ्या जातिवंत काव्याचें तर वैशिष्ट्य हेंच कीं शब्द थोडे पण अर्थगांभीर्य मोठें! प्रस्तावना थोडी लांबली पण त्याला इलाज नाहीं. कवितेचा गर्भित अर्थ तरी स्पष्ट केला पाहिजे!

× फकिराचें हें गाणें या चालींत बरोबर बसतें म्हणून तेंही दिलें यांतच रेटून!



येथ खालती अथांग सागरांत रे, ओढुनि कुणि नेलें तुज सांग मज बरें ?

आदळती या लाटा थाड थाड रे—
दगडावरि खडकावरि रोदनस्वरें ३

बोलाया धडपडते जीभ त्यांपरी
अडखळते, तुमटे वच, होय घाबरी ! ४

हृद्भावा वाणी नच व्यक्त करुं शके
फुटतें हें काळिज परि हाय ! मी थकें ! ५

तो तिकडे नावाडी गीत गातसे !
धीवरशिशु हास्य लास्य हा करीतसे ! ६

आनंदें जग चालें पूर्विंच्यापरी
दर्शन तव दुर्लभ मज होय भूवरीं ! ७

हिंडहिंडलों त्रिखंड ना तरी अतां
तें तव शुभ दर्शन मज होय तत्त्वतां !! ८

# सुकली मम जीवन-कलिका !

[ पत्नीच्या निधनानंतर अल्पावधींतच बापड्यावर एकुलत्या **एक मुलीचें** निधन पाहण्याचा प्रसंग आल्यावर त्याला असा भ्रम कां **होणार नाहीं?** प्रस्तुत गीत हें एका सत्यकथेवर आधारलेलें आहे. ]

[ **चालः**—'राजहंस माझा निजला' ]

[ १ ]

हें कोण बोलिलें ऐका——
'सुकली मम जीवन—कलिका !'

दुर्दैव बिचाऱ्याचें कीं । प्रिय पत्नी सोडुनि गेली——
स्वर्गाला,—टाकुनि मागें । लाडकी जिवाची छकुली !
फोडिला तयानें टाहो । दुःखानें लोळे खालीं !

आकांत मांडिला रडुनी
नेत्रांतुनि लोटें पाणी
अति दीनपणें ओरडुनी

विठ्ठल तो वदला ऐका । 'सुकली मम जीवन—कलिका !'

[ २ ]

तें हृदय पित्याचें कैशी— । वर्णाया शकते वाणी !
वंशाला जावें त्याच्या । तेव्हांच येइ तें कळुनी !
कल्पना नको दुःखाची ।—वैऱ्यासहि याया चुकुनी !

तें दुःख कसें वर्णावें !
तें मातपित्यासचि ठावें !
तें स्वयंसिद्ध भोगावें !

मग खुशाल कुणिंही ऐका—। 'सुकली मम जीवन–कलिका !'

[ ३ ]

बालिका सात वर्षांची । आकस्मिक मरुनी पडली !
ती जिवंत कीं मेलेली । सांगतां नये त्या काळीं !
रसरशीत मुख तें ताज्या– । कमळाची त्यावर लाली !

मांडीवर त्याच्या निजलें
सुंदर तें बालक छकुलें
जरि मरून तें पडलेलें—

तरि त्याचा एकचि हेका।—'सुकली मम जीवन–कलिका !'

[ ४ ]

न्यावया लोक येतांना । तो वदे 'हळू बोला हो !'
मम बाळ लाडकी निजली । आतांच कुठें देखा हो !
घेउं द्या झोंप तिज पुरती । तुम्हि दूर येथुनी जा हो !

लाडकीस मी थोपटिन
तिजवरी गीत गाईन
मी सारें कांहीं करिन

बोलिलों नीट हें ऐका । 'सुकली मम जीवन–कलिका !'

[ ५ ]

पाणी कुणिं थोडें आणा । डोक्यावर शिंपायाला ।
ती तिरिप उन्हाची पडुनी । सुकली ही कोमल बाला ।
नाजूक, जलाविण, जीव । उघड्यावर वाळुनि गेला !

ही उठेल आतां फिरुनी
घातलें मुखीं जर पाणी
जागी मग हो खडबडुनी
मग कळेल तुम्हां ही कां । ‘ सुकली मम जीवन–कलिका !’

[ ६ ]

बागेंत फुलें तोडाया । गेली ही आतां होती ।
परडींत फुलें हीं दिसतीं । हीं पहा, पहा ! तिजसम तीं !
हौस ही तिला पुष्पांची । जन्मतांच मोठी होती ।

डोक्यांत फुलें हीं सुकलीं
नेत्रांत फुलें हीं खचलीं
गालांत फुलें हीं रुसलीं
आणा हो पाणी....ऐका ! ‘ सुकली मम जीवन-कलिका !’

[ ७ ]

पाण्यास्तव अर्धे उघडें । चिमणीचें चिमणें तोंड !
चिंव चिंव चिंव चिंव चिंव करुनी । जाहलें कसें हें रोड !
हे गरगर डोळे फिरुनी । जाहले कसे हो जाड !

पंखांत रुक्षता आली
देहावर ग्लानी चढली
म्लानता मुखावर बसली
आणा जल सत्वर---ऐका ! ‘ सुकली मम जीवन-कलिका !’

* * *

[८]

कां घेतां हिसकावून । लाडक्या छबीला माझ्या ?
ती मेली म्हणुनी रडतां- । कां कुठें सोडल्या लाजा ?
हें द्वाड अमंगल वदतां— । जा पुढुनी माझ्या जा, जा !

ठेवीन हिला हृदयांत
कोंडुनी खोल पडद्यांत
ती तिथें निजे मग शांत

जा ऐका माझें ऐका ! । ' सुकली मम जीवन-कलिका '

* * *

[९]

किती ओरडुन मी वदलों । नाहींच तुम्हीं जायाचे !
काळासम दृष्टी तुमची । छकुलीला माझ्या जाचे !
भाल्यासम हृदयीं माझ्या । भेदक ही दृष्टी टोंचे !

थांबाल जरा तरि कां हो ?
ही माझ्याजवळीं राहो !
एकली एक मजला हो !

किति सांगूं मारुन हांका । ' सुकली मम जीवन-कलिका ! '

[१०]

तेजाची केवळ मूर्ती । चमकती तारका नेत्रीं ।
गगनश्री देहावरती । ती विद्युत् चमके गात्रीं ।
चपलता वसे सर्वांगीं । विमलताहि गात्रोगात्रीं ।

ही विमल गुणांची खाण
ही माझे पंचप्राण
हृद्‌हिंदोलीं निजवीन
लाडकीस देइन झोंका । 'सुकली मम जीवन-कलिका!'

* * *

[११]

ही खरें काय गेली हो ! । सोडुनि या मर्त्य जगाला ?
निष्प्राण देह पडला कां-। या कलिकेचा धरणीला ?
आवडली बाळी माझी । कां देवांच्या देवाला ?
मज दिधली आणिख नेली
हिसकावुन माझी छकुली
मति माझी कां हो भ्रमली ?
किति करूं अतां या शोका ! 'सुकली मम जीवन-कलिका!'

* * *

[१२]

क्षण थांबा !....मीही आलों ।
बाळेसह स्वर्गीं जाया !
नवखीं तीं तोंडे बघुनी । कोठलें तिला करमाया ?
मी बसतों घेउन सरणीं- । भिजवीत अश्रुनें काया ।
ती कोमल सुंदर बाला
बाधेल अग्निची ज्वाला
मी धरीन तिज हृदयाला !
येतों मी म्हणुनी,....ऐका..! 'सुकली मम जीवन-कलिका!'

—x—

# बाळ अलंकार यास--

[ ‘अलंकार’ मासिकाच्या ५व्या वाढदिवसाप्रीत्यर्थ रचिलेलें गीत. ]

( वसंततिलका )

पाऊल हें तव पडे अजि पंचमांत
ऐकोनि हर्ष नच मावत या मनांत
बाळा, सुरम्य अति गोंडस तूं लहान
‘येतां कसा दुडुदुडू दिसतोस छान’— १

हें पाहण्या मज गमे जरि तेथ यावें
दैवेंचि कां अजि बरें मज आडवावें ?
वाटे सहर्ष तुजला करिं जोजवावें
खांद्यावरीं, कटिवरीं, शिरिंही धरावें २

गुंतोनि येथ बसलों घरच्याच कामीं
आलों समक्ष असतों बघ ना तरी मी
सोत्कंठ मानस तुला हृदयीं धराया
वाऱ्यावरीं बसुनि तेथ शकेल याया ३

आतां असेंचि करितों—मनिं आठवीतां ।
आशिर्वचा शुभ तुला इथुनीच देतों ॥
बाळा, असाच पुढतीं पद टाक टाक ।
आनंद दे करुनि जागृत अज्ञ लोक ४

रे आपुला प्रखर सूर्य मराठमोळा ।
झाला असे परम शीतळ थंड गोळा ॥
चेतीव त्यांस करि तप्त विशाल गोल ।
ही आस एक पुरवी पुरवीच, बाळ ! ५

( अनुष्टुभ् )

' अलंकार ' तुला साजें नाम सार्थ तदा खरें ।
मराठ्यांच्या यदा कंठीं शिरीं शोभसि बाळ, रे ॥

—+—

## ही धांदल धडपड कां रे ?—

( रागः—भीमपलासी. ताल—त्रिवट. )

नश्वर जीवित सारें ।
ही धांदल धडपड कां रे ? ॥ ध्रु० ॥
पोटासाठीं इतुकी खटपट
टीचभरी तें—भरेल झटपट
मग करिसी कां भलती लटपट ?
क्षणभर जीवित बा रे । ही धांदल धडपड कां रे ? १
भरविसि हा बाजार कशाला ?
खोटा सौदा व्यर्थ उशाला !
कां भुलसी या स्वप्नसुखाला ?
स्वप्नचि तें अवघें रे । ही धांदल धडपड कां रे ? २

पाय दुज्याचा व्यर्थ ओढणें
कैंसानें वा गळा कांपणें
स्वार्थ आपुला साधुन घेणें
व्यर्थचि हें जगणें रे । ही धांदल धडपड कां रे ? ३

आळवावरचें चंचल पाणी—
क्षणभंगुर हें जीवित मानी !
धडपडसी कां वेड्यावाणी ?
हाव तुला किति बा रे ! ही धांदल धडपड कां रे ? ४

'माझें माझें' म्हणुनी वदसी
ओझें परि दुसऱ्याचें घेसी
हमाल तूं रखवाली करिसी
जाइल तव धन सारें । ही धांदल धडपड कां रे ? ५

काळाच्या दाढेंत बैसुनी
गिळिसी गटगट मानवप्राणी
रुधिरप्रिय राक्षस कां कोणी
सांग असासि तूं बा रे ? । ही धांदल धडपड कां रे ? ६

प्रेतावरिं दुसऱ्याच्या बांधिसि—
संसाराचे वाडे दिननिशिं
भूकंपाच्या धक्क्यासरशीं
येतिल खालीं सारे । ही धांदल धडपड कां रे ? ७

खेळ खेळुनी संसाराचा
लुटूपुटीचा भातुकलीचा

व्यर्थ उशासीं घेउनि साचा
अल्पशयन करशिल रे । ही धांदल धडपड कां रे ? ८

ईशसृष्टि-विध्वंसक पोरा !
खट्याळ निष्ठुर पापागारा !
चुरडुनि टाकिसि फुलें भरारा—
काय म्हणुनि हीं बा रे ?। ही निर्दयता तव कां रे ? ९

तात जगाचा ईश्वर तो बघ !
आला तुजला शिक्षाया बघ !
धांव धांव, पळ ! त्याच्या लगबग—
लोळण चरणीं घे रे ! । ना व्यर्थ तरी मरशिल रे ! १०

----

## रामकृष्ण—

[ स्वामी रामकृष्ण परमहंस यांचेवर हें गीत विरचिलें आहे. ]

( रागः—भीमपलासी. तालः—दादरा. )
( चालः—' आदिपुरुष नारायण ' )

परम विमल तेजोमय । ध्यानमग्न दिव्यरूप ।
गुरुराया, **परमहंस** । नयनरुचिर त्वत्स्वरूप ।। ध्रु. ।।
स्थिरचर जग हें नितांत । रमत खचित चित्सुखांत ।
देखुनि तव रूप शांत । वदति तुजसि ' **रामकृष्ण** ' ।।

—०—

# बालिकेची जिज्ञासा—

(वृत्त—तूणक. राग—कामोद. ताल—दादरा.)

[ *हल्लींचीं मुलं म्हणजे कांहीं विचारूं नका ! वयस्क माणसांनीं त्यांना जरा भिवूनच वागलें पाहिजे ! नाहींतर तीं त्यांना पुढें काय विचारतील हें सांगतां यायचें नाहीं ! फुगटून बसलेल्या पांच वर्षांच्या आपल्या छबकडीस आई प्रेमानें जवळ बोलावते, पण मुलीची भलतीच जिज्ञासा पाहून बिचारी सर्दच होते ! ]

**आई**:—बाळ लाडकी किती ग । बाइ माझि छबकडी
देखणी किती ग गोड । बोलते हि घडघडी
बोल बोल, राजसे ! । मला सुरेख एक दे—१
पापि ही तुझी मला । पटापटा आणीख दे

**छबकडी**:—आम्मि नाइ दा ऽ ऽ — खलंच
आइ, एक बोलुं कां ?

**आई**:—बोल, बोल, ये अशीच । बाळ एक दे मुका

*प्रस्तुतचें नाट्यकाव्य म. ल. गर्ल्स हायस्कूलच्या मुलींनीं नगराध्यक्ष ॲडव्होकेट एस्. जी. दाभोळकर यांचे अध्यक्षतेखालीं झालेल्या शाळेच्या विविध करमणुकीच्या कार्यक्रमादिवशीं मेकअप् करून हार्मोनियम, तबला व जलतरंग याचे सुंदर साथींत परिणामकारक रीतीनें गाऊन व अभिनय करून म्हटलें.

**पात्रेः—**

आई—कु. प्रभावती मसुरेकर, इयत्ता इंग्रजी ५ वी.
छबकडी—कु. विमल मेस्त्री, सिनेमा स्टार, इयत्ता इंग्रजी ३ री.

**छबकडी**:—आइ, बोललें, पलंतु—मालनाल नाइ ना ?

**आई**:—नाहीं बाळ काय पाहिजे तुला ग बोल ना ?

**छबकडी**:—थोपतून तूं मला । हलुंच जासि टाकुनी—
लाल्लिच कुठं खलंच ? । सांग सांग मज झणीं ?

**आई**:—इश्श ! कारटी खट्याळ ! । काय सांगुं मी तुला !
लग्न होऊं दे करून । येइ तें तुझें तुला !

---

# राजेश्वरा, रामराजा उदारा !

[ थोडक्याच महिन्यांपूर्वी कै. **श्रीमच्छत्रपति राजाराम महाराज** यांचे वाढदिवसाप्रीत्यर्थ ‘ दीर्घायुचिंतन ’ या शीर्षकाखालीं हें गीत लिहिलें होतें; परंतु दुर्दैवानें थोडक्याच अवधींत निर्घृण काळानें त्यांना आमच्यांतून ओढून नेलें व त्यांच्यावर ‘ विलापाश्रु ’ शोकगीत लिहिण्याची पाळी आली.]

( **राग**—खंबावती. **ताल**—दीपचंदी )

राजेश्वरा, **रामराजा** उदारा !
खरा धन्य तूं एक या भूवरीं
सामर्थ्य अंगीं तुझ्या **थोर**, भूपा !
तसें पाहिलें मी न कोठें तरी ! १

तुझी भव्य मूर्ती, तुझी दिव्य दीप्ती,
तुझी धर्मनिष्ठा, तुझी सत्कृती,
तुझी त्यागवृत्ती, तुझें दानशूरत्व,
—शोभे तुला ही तुझी सुकृती २
विद्याकलांचा खरा तूंच भोक्ता,
ज्ञाता तसा पुण्यशाली नृपा !
ज्ञानामृताचा मिळे येथ प्याला
कुणालाहि प्याया तुझी ही कृपा ! ३
हा उच्च हा नीच, हा थोर तो सान,
राया ! असा भेद नाहीं तुला
होसी प्रजेचा पिता तूंच साचा,
गुणांची तुझ्या ये न कोणा तुला ! ४
शीतप्रभा ही तुझी चंद्रकांती,
**तारापती** सार्थ होसी खरा
वाढो कला ही तुझी नित्य ऐशी,
पूर्णेंदु हो राजराजेश्वरा ! ५

*　　　*　　　*

दीर्घायु लाभो तुला **रामराजा** !
राहो अशी ही तुझी शीतला–
कांती सुधा सिंचणारी, करी जी—
सदा धौत नी स्वच्छ या भू-तला ! ६

# विलापाश्रु

( रागः-जोगी. तालः-दीपचंदी. )

कसा पातला आज अंधार लोकीं !
प्रभू चालला आमुचा हा विलोकीं ! १
नृपश्रेष्ठ भूपाल त्राता प्रजेचा
पिता साच जो दीन ऐशा जनांचा ! २
तनू वाहिली लोककल्याणकार्जी
पडे तो इथें नाथ निष्प्राण आजी ! ३
लया पावल्या मूर्त आशा मनींच्या
चिता पेटल्या अंतरींच्या सुखाच्या ! ४
मना लागली आग जो दाह झाला—
कशी कल्पना ये तयाची कुणाला ? ५
दिशा जाहल्या शून्य ! अंधार आला !
नभीं सांचल्या कज्जली मेघमाला ! ६
जिथें वर्षती मेघही अश्रु वाटें—
तिथें अंतरीं शोक कैसा न दाटे ? ७
झडेना इथें चौघडा राजधामीं !
कुणीं शीळ फुंकी न आतां रिकामी ! ८
कधीं ना अतां रोल्सराइस् फिरेल !
प्रभू ना कधीं येथ मार्गीं मिळेल ! ९
नवा राजवाडा पहा शून्य झाला
पडे त्या तिथें आज दुर्दैव-घाला ! १०

इथें कोसळे वीज राणीवशांत !
महाराज्ञिच्या अंतरा पेटवीत ! ११
चला लागला अग्नि आतां शवाला !
नृपप्राणज्योती मिळाली नभाला ! १२
चला गाळुनी अश्रु हे शांतवूंया
चिता ती प्रभूची चला मालवूंया ! १३
मिळूं दे तया शांतता स्वर्गलोकीं
करूंया अशी प्रार्थना मृत्युलोकीं. १४
नका हो नका अश्रु गाळूं नका हो !
महाराज्ञि ताराभर्ता शांत व्हा हो ! १५
प्रभूला किती दुःख होईल तेणें—
करा कल्पना—आवरा अश्रु येणें ! १६
असे कन्यका एक आतां तुम्हाला
चिरंजीव होवो सुखी तीच बाला. १७
पुढें मागुती सर्व कांहीं जुळेल
मनासारिखा हेत तोही पुरेल १८
करा राज्य हें हिंद—तारप्रमाणें
अहिल्या सती साध्वि मातेप्रमाणें १९
प्रजा पुत्रवत् आपली मानुनीया.
करा राज्य हें अंतरीं जाणुनीया २०

—०—

## स्वदेशी–

( चालः–' जरी कुणा श्रीमंताची..' )

देइ पूर्ण स्वातंत्र्याला एक ही ' स्वदेशी '
पारतंत्र्यपाशा तोडी एक ही ' स्वदेशी ' ॥ ध्रु० ॥

स्वावलंबनाचें देई बाळकडू लोकां ।
सुप्त भावनांसी उठवी, नेइ दिव्य लोका ॥
दिव्य तेज तेथुनि धाडी आज हिंदभूंत ।
तेंच संचरें हें आम्हीं पाहतों जनांत ॥
शक्ति दिव्य भरली ठायीं जिच्या एक ऐशी ।
अन्य कोण दुसरी नच ती वांचुनी ' स्वदेशी ' ॥

—S—

## राजाराम कॉलेजची ज्युबिली.

( कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजची ज्युबिली शनिवार ता. ५ डिसेंबर १९३१ रोजीं झाली. त्यावेळीं ऑकेस्ट्राचे साथीवर गायिलेलें भारतगीत. )

( चालः–चंद्रकांत राजाची कन्या. )

अनुपम सौंदर्याच्या माझ्या प्रियतम कॉलेजा
प्रणाम घे हा माझा, जिवलग जीवाच्या राजा ! १

जगदंबेच्या पुण्यक्षेत्रीं तव झालें जनन
जरामरण हें तुला न, अनुपम सुंदर तूं तरुण ! २
अविरत वाहे पवित्र जेथें गंगा झुळझुळ
ज्ञानजलाचे प्रवाह तेथें वाहतात विमल. ३
निसर्गसुंदर पवित्र ऐशा ठायीं तूं वसुनी
अमरपदाची ओळख देसी जगताला करुनी. ४
उंच काढुनी मान आपुलीं शिखरें तव वदतीं,
'ही ध्येयाची प्रबल मनीषा अमुची बघ वरती. ५
येथुनि खालीं कुसुमतरूंना तैसें इतरांना——
अवलोकुनि 'हें ध्येयचि गांठा' वदती ते त्यांना. ६
हा इकडे कारंजा करतो नाच मौक्तिकांचा
तो तिकडे वर फडफड करतो '**भगवा**' शिवबांचा ७
घण घण घण ही घंटा वाजे ज्ञानमंदिरांत.
छत्रपतींची नौबत गाजे राजमंदिरांत ८
लक्ष्मी, देवी सरस्वतीचा संगम हो कचित
परि या दोघी प्रेमळ भगिनींसम नांदति येथ. ९
नृत्य करी हा मयूर इकडे थै थै नाचोनी
वीणावति सुंदरा इथें ही लीन सदा गानीं १०
वाग्देवीच्या भक्तजनांची आंत तुझ्या वसती
उज्ज्वल माणिकरत्नासम ते बहुशोभा देती ११
**न्यायमूर्ति रानडे, गोखले** झाले मुगुटमणी–
वाग्देवीचे; **मोडक, आपटे** हेही कंठमणी. १२

सरस्वतीच्या विमल मंदिरा ! महिमा तव जगतीं-
थोर म्हणोनी नररत्नें हीं येथें सांपडतीं. १३
असो सुदैवें तुला लाभले **श्रीराजाराम**
**छत्रपती श्रीशाहूनंदन** नृप सद्गुणधाम. १४
तनमनधन निजकार्य म्हणोनी अर्पियलें तुजला
**सुवर्णदिन** हा म्हणुनि राजसा ! आज तुला आला १५
**बाळकृष्ण पंडितजी शर्मा** तैसे बहु झटले
स्थित्यंतर हें तेव्हां होवुनि हे दिन तुज आले १६
ऐशी तव ही ज्ञानवाहिनी गंगा वाहूं दे
आसपासच्या पुष्पलतांना पोषित जाऊं दे १७
सज्जनसंगम तुझा लाभुं दे प्रियतम कॉलेजा !
प्रणाम घे हा माझा जिवलग, जीवाच्या राजा ! १८

---

## दहन-भूमीवर

[या जगांत असंख्य नररत्नें केवळ परिस्थितीच्या अननुकूलतेमुळें जन्मास येतात तशींच मरून जातात. त्यांच्या आशा आकांक्षा दहनभूमीवरील चितेंत भस्म होऊन जातात. सायंकाळीं फिरत फिरत घरीं परत येत असतां दहनभूमीवर जळत असलेल्या काहीं चिताकडे पाहून जे विचार सुचले तेच या काव्यांत ग्रथित करण्याचा प्रयत्न केला आहे.]

( **चालः**-'किरकिरती रातकिडे झाल्या तिन्हिसांजा' )

घंटांचा नाद उठे मृदु माझ्या कानीं
गाई म्हशि रानांतुनि आल्या परतोनी १



येथ पहा गगनाला भिडती या ज्वाला, मृत तनुंची यांत जळे करुणामय माला ॥

लगबगतीं वत्सें घरिं मातेसह जाया
स्तनपानास्तव बाळें लागतिं झोंबाया २
श्रमलेला शेतकरी चाले हळु वाट !
संपेना लवकर ती–झाली तनु ताठ ! ३
विश्वावरिं पसरे हळु अंधारी रात्र
मी अन् जग भीषण हें येथ दिसें मात्र ! ४
स्वप्नापरि भासें हें शून्य मला सारें
जीवित अति चपल जणू चंचलगति वारें ! ५
मायेचा खेळ असा चाले जगतांत
क्षणभर दिसतें न तोंच सारें जग शांत ! ६

*　　　*　　　*

येथ पहा, गगनाला भिडती या ज्वाला !
मृत तनुंची यांत जळे करुणामय माला ! ७
जीव कुडीं होता तंव धडपडले सारे
रक्षा परि त्यांची ही आतां येथ उरे ! ८
गगनाला घालावा हातहि कीं ज्यांनीं
ऐसे कवि श्रेष्ठ गुणी जळती या सरणीं ! ९
विश्वाचा दर्प जयें घालविला असता—
शूर असें स्वर्गाला जाती ते आतां ! १०
आकांक्षाआशांची होळी ही येथें—
धडधड ही पेटत जणुं–काळिज मम फाट ! ११
रानांतिल पुष्पेंही कुणिं नच देखियलीं
निर्जन वनिं एकलींच लाजुनि हो मेलीं ! १२

दरवळला दिक्प्रांतीं त्यांचा जरि वास
हुंगियलें नच कोणीं त्यांना परि खास ! १३
उज्ज्वल नर-रत्नें हीं सागर-तळिं दडलीं
जन्मा जशिं आलीं तशीं हाय! तिथें मेलीं ! १४
विश्रांतिल सौख्याचा वारा नच शिवला—
त्यांना—नच धीराचा शब्दहि कुणि दिधला ! १५
संधी कुणि नाहीं त्यां वर येण्या दिधली
**विश्वाचीं हीं छकुलीं गुणि बाळें निजलीं !** १६
नेत्रांतुनि वाहे हा अश्रूंचा पूर
स्मृति-सुमनें या, करितों त्यांचा सत्कार ! १७

---

# उठा हो ! उठा हो ! मराठे, उठा हो !

[ प्रस्तुत काव्य मराठा जातीला उद्देशून लिहिलें नाहीं. महाराष्ट्रांत रहाणारे ते मराठे किंवा मराठी भाषा ही ज्यांची मायबोली आहे ते भारत-वासी लोक मराठे होत; आणि त्या सर्वांना उद्देशून हें काव्य लिहिलें आहे. ]

( **राग**:—खंबावती. **ताल**:—दीपचंदी, मात्रा ७ )

उठा हो, उठा हो, मराठे उठा हो !
यशाचे भरा शुभ्र आतां घडे
कृती कांहिं थोडी करा, शौर्य दावा
नका मात्र बोलूं उगें तेवढें ! १

कृतीचा असे काळ हा आज आला
नको शब्दपांडित्य ! आतां पुरे !
व्याख्यानबाजी पुरे ! वीरबाजी—
तुम्हीं युद्ध-गाजी रणीं व्हा खरे ! २
शस्त्रें जरी गेलिं वा हातचीं तीं
नका मान टाकूं अशी नेभळी !
उठा सज्ज घेऊनि अस्त्रें मनाचीं
मनोरूप अस्त्रेंच हीं चांगलीं ३
उभे छाति काढोनि राहा असे नीट
बच्चे कुणाचे तुम्ही, नेणतां !
मराठा गडी, मायबोली मराठी—
जयाची असे तोचि हो तत्त्वता ४
असो तो कुणीही न पर्वा तयाची
असो मात्र तो जन्मला भारतीं
मराठा गडी तो मला वंद्य ! काया—
तयाच्या सुखा अर्पुं ही संप्रती ५

* * *

इथें हें पहा, मातलें रान सारें
इथें केवढी घाण ही सांचली !
मराठासमाजीं किती दुष्ट चाली
किती रूढ तत्त्वें वृथा बिंबलीं ! ६
करा नेस्तनाबूत हीं आज आधीं
करा जागृती अज्ञलोकीं स्वता

खरे प्यार हे मावळे त्या शिवाला
जिवाला दिला जीव ज्यांनीं स्वता ७

* * *

अतां एकरूपें पहा ! ही निघाली
कुठें फौज ? आणीख हें काय हें !
तिथें झुंजती आज राष्ट्रें किती हीं !
कशासाठिं स्वप्राण देतात हे ? ८
उठे जर्मनी खावयाला जगाला
तया काळसर्पास ठेंचावया
इंग्लंड–पातालखंडांतही आज
सेना असे सज्ज ही जावया ९
पहा चीन, तें ग्रीस, मोठें नि छोटें !
रणीं झुंजती राष्ट्र राखावया
अम्हीं मात्र वाचाळ, निःसत्व, द्रोही
स्वकीयांस जातों बरें खावया ! १०

* * *

उठा हो, उठा हो मराठे, उठा हो !
यशाचे भरा शुभ्र आतां घडे
कृती कांहिं थोडी करा, शौर्य दावा
नका मात्र बोलूं उगें तेवढें ! ११

—०—

# घातली रजनीनें रांगोळी—

( चालः—' देस बंगाला मोरे राजा. ' तालः—धुमाळी )

आला सण दिपवाळी
लागल्या लक्ष दिव्यांच्या ओळी ||ध्रु०||
अनंत दीपांच्या या ज्योती
नभो मंडलीं लकलकताती
तारांगण ज्यांना जन म्हणती
या इकडे वर खालीं
लागल्या लक्ष दिव्यांच्या ओळी १
कुणी फटाके उडविति वरती
फुलबाजा वा चंद्रज्योती
तेजाचीं खेळतिं बाळें तीं
आला सण दिपवाळी
लागल्या लक्ष दिव्यांच्या ओळी २
रजनीचीं किंवा छकुलीं तीं
स्वर्गंगेमधिं स्नानचि करितीं
धवल तयांचीं मुखकमलें तीं—
जलपृष्ठावर आलीं
लागल्या लक्ष दिव्यांच्या ओळी ३
चंद्रकळा नेसुनि वा काळी
ठिपक्यांची घालुनि वर चोळी
रजनीमाता मिरवित आली—

घालाया रांगोळी
लागल्या लक्ष दिव्यांच्या ओळी ४
आकाशाच्या दिव्य आंगणीं
तेजाचा हा सडा शिंपुनी
भूगोलावर मांड ठोकुनी
घाली मग रांगोळी
आला, आला सण दिपवाळी ! ५
खंडें मोठीं मोठीं केलीं
देशांचीं मग नांवें भरलीं
अनेक सुंदर नगरें रचिलीं
आला सण दिपवाळी
घातली रजनीनें रांगोळी ६

—×—

## मधुसूदनः—

( चाल—शंकरा. ताल—त्रिताल. )

मधुसूदना मनमोहना । तव रम्य लीला रमवी कुणा ना ? ।।धृ०।।
मोहवि मुरली तव जगताला । मधुवल्लरी रंजवी ही मनाला १

( राग—मांड. ताल—केरवा. )

कमलमुख आज शाम गिरिधारी ।
वाजवि मुरली गोड गोड ही । आज शाम गिरिधारी ।।धृ०।।
मनकामना यदुनंदना ।—पाजीव ही जीवन-माधुरी ।
आज शाम गिरिधारी ।। १



सांगुन नव नित्य गोष्टी

ठेविन तव हृत्कपाटिं

बालमूर्ति, जयमालादेवि रुचिर बाले !

## रुम झुम झुम, .... .... बाले !–

[ श्री. काकासाहेब कागलकर, घाटगे सरकार, जहागिरदारसाहेब, कागल ज्युनिअर, यांच्या छोट्या बेबी महाराज **श्रीमंत जयमाला देवी घाटगे** यांचें वय, त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचें बालमुग्ध गोड भाषण, त्यांची मनोहर खेळकरवृत्ति, एकाद्या गुलजार रांध्याच्या बाहुलीप्रमाणें चेतोहर दिसणारे त्यांचे आविर्भाव व मायापाशांत गुरफटून टाकणारें त्यांचें विशुद्ध व विशाल बालहृदय यांमुळें हें गीत त्यांच्यावर लिहिण्याची सहजस्फूर्त प्रेरणा झाली. ]

( चालः—' बरकत वा लीनो ठाडो.' राग—पिलु. ताल—एकताल. )

रुम-झुम-झुम, रुम-झुम-झुम, नाचत ये बाले !
गोड तुझें गीत मदिय हृदयांतरिं खेळें ॥ ध्रु० ॥

बालिश तव मूर्ति मधुर
लाडकि सुकुमार रुचिर
मोदवि, मन रंजवि मम । मुग्ध मधुर बाले ॥ रुम झुम० १

चपलेसम चंचल गति
बाल हरिणिची सुकांति
नयनिं तारकांचि दीप्ति । चमकत अयि बाले ! ॥ रुम झुम० २

विश्वाच्या खेळांतिल
बाहुलि तूं चतुर गुणिल
सुंदर अति रम्य विमल । गमसि मजसि बाले ! ॥ रुम झुम० ३

खेळावे खेळ तुजसि
बोलावें नित्य तुजसि
पोहावें मोदसरसिं । वाटे मज बाले ॥ रुम झुम० ४
सांगुनि नव नित्य गोष्टि
ठेविन तव हृत्कपाटिं—
बालमूर्ति, जयमाला देवि, रुचिर बाले ॥ रुम झुम० ५

## तिळगूळ—

(राग—सारंग. चाल—'टाळा निजपर.' ताल—त्रिताल)

तिळगूळ घ्या—घ्या—घ्या हो
ध्या हो तिळगूळ ॥ ध्रु० ॥
प्रेमसुधारस सिंचुनि केले ।
गोड गोड किति तरि हे तिळगूळ ॥ घ्या-घ्या० १
हृदयरंग किति तरी नवोनव ।
दाविति सुंदर हे मम तिळगूळ ॥ घ्या-घ्या० २
'कटुवच सोडुनि मधुवच मधुसम ।
बोला' वदती हें मम तिळगूळ ॥ घ्या-घ्या० ३

* * *

पुलकित तनु रोमांच उभारुनि ।
सर्वांगाचे झाले तिळगूळ ॥ घ्या-घ्या० ४

समाप्त

# हवेल्या

( निवडक लघुकथांचा संग्रह )

लेखक :

**श्री. प्रल्हाद रघुनाथ इंगळे,**

बी. एस्. सी., एल्एल्. बी.

किंमत १। रु. पृष्ठें १४०

प्रकाशक :

**साहित्य सत्कार-संस्था,**

**कोल्हापूर.**